


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४४ । अंक २ । डिसेंबर १९९०
मार्गशीर्ष-पौष, शके १९१२.
किंमत ७ रुपये. वार्षिक वर्गणी ६० रुपये.
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ५००/– संस्था : रु. ७५०/–



---



---

**संपादकीय पत्रव्यवहार :**
मे. पुं. रेगे,
संपादक, ' नवभारत ' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

---

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकासाठी ' स्थायी निधी ' निर्माण केला आणि अनुदानही दिले आहे.

अनुक्रमणिका








# नवभारत

डिसेंबर १९९०

अनुक्रम



## लेखक-परिचय


■ **सी. पं. खेर :** अर्थशास्त्राचे अभ्यासक; गांधी चौक, धारवाड–५८० ००१. ■ **अ. ना. ठाकूर :** मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इत्यादी विषयांचे संपादक; वाई–४१२८०३. ■ **प्रल्हाद मुदगल :** कन्नड तसेच मराठी नाट्यसाहित्याचे व्यासंगी; इ–२, श्रद्धामाता– सी. एच. एस., पोवई, मुंबई–४०० ०७६. ■ **रा. भा. पाटणकर :** मुंबई विद्यापीठात इंग्रजी विभागात प्राध्यापक; २ शाकुंतल, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई–५१. ■ **वसंत केशव पाटील :** प्राध्यापक, स. गा. म. महाविद्यालय, कराड; ४/९ भूपेश अपार्टमेंट्स, विद्यानगर, कराड–४१५ ११०.


❋ ❋

## संपादकीय

### हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (१४)*

आपल्या पुढचा प्रश्न आहे तो असा : मोक्ष हा जर पुरुषार्थ असेल तर त्याचा इतर पुरुषार्थांशी– धर्म अर्थ आणि काम ह्यांच्याशी– समन्वय साधता आला पाहिजे. मोक्ष-धर्म-अर्थ-काम ह्या पुरुषार्थचतुष्टयावर आधारलेल्या, हे चतुष्टय साध्य करू पाहणाऱ्या आणि अंशतः तरी साधू शकणाऱ्या अशा व्यवहार्य जीवनसरणीची कल्पना करता आली पाहिजे. आता धर्म-अर्थ-काम ह्या त्रयीवर आधारलेल्या जीवनसरणीची कल्पना करण्यात काही अडचण येत नाही. पण मोक्षाचा धर्म-अर्थ-कामाशी समन्वय साधण्यात अडचण येते असे प्रथमदर्शनी तरी वाटते.

ही अडचण दुहेरी आहे. एखादी व्यक्ती मुमुक्षू असते, ती मोक्ष साधू पाहत असते आणि त्यासाठी तिने केलेले प्रयत्न यशस्वी झाले, की तिचे साध्य तिला प्राप्त होते, ती मुक्त होते असे मोक्षसाधनेचे वर्णन करावे लागेल. ती व्यक्ती प्रारंभी मुक्त नव्हती पण तिने मोक्ष साध्य केल्यानंतर मुक्त ही तिची अवस्था झाली असे ह्या प्रक्रियेचे स्वरूप आहे. पण सांख्य किंवा अद्वैत ह्या दर्शनांच्या दृष्टीने जे मुक्त असते ते नित्य मुक्त असते आणि जे नित्य मुक्त आहे त्याला अर्थात मोक्ष साधावा लागत नाही, त्याला मोक्षसाधना असूच शकत नाही. उदा., अद्वैताच्या दृष्टीने ब्रह्म हे नित्य मुक्त आहे आणि केवळ ब्रह्म हेच नित्य मुक्त आहे; आणि अर्थात ब्रह्माला मोक्षसाधना नाही. उलट, एखादा 'जीव' घेतला, एखादी विशिष्ट व्यक्ती घेतली तर ती मुमुक्षू आहे, मोक्ष साधण्यासाठी ती प्रयत्न करते असे असू शकते. पण ( तिचे हे प्रयत्न यशस्वी होऊन ) तिने मुक्त ही अवस्था प्राप्त करून घेतली आणि ती नंतर मुक्त ह्या अवस्थेत आहे असे सुसंगतपणे म्हणता येत नाही. कारण ती मुक्त होते तेव्हा ती ब्रह्मरूप होते; आता केवळ ब्रह्म उरते आणि ब्रह्माहून भिन्न असलेली अशी ती व्यक्ती उरतच नाही. ज्या व्यक्तीने मोक्षसाधना केली तिची साधना यशस्वी झाली आणि ती मुक्त ह्या अवस्थेत आहे हे म्हणणे आत्मविसंगत ठरते. मोक्ष हे जर व्यक्तीचे साध्य असेल तर ते असे साध्य आहे, की ते प्राप्त करून घेतलेली व्यक्ती असूच शकत नाही. ते साध्य अतिशय कठीण असल्यामुळे ते सिद्ध केलेल्या व्यक्तीचे उदाहरण मिळू शकत नाही असे नव्हे तर 'ते सिद्ध केलेली व्यक्ती' ही कल्पनाच तर्कदुष्ट आहे. तेव्हा अद्वैताच्या दृष्टीनें मोक्ष म्हणजे व्यक्ती जो आपल्या प्रयत्नांनी सिद्ध करू शकेल असा पुरुषार्थ नव्हे.

( सांख्य दर्शनाच्या दृष्टीनेही मोक्षाच्या संबंधात ह्याच स्वरूपाची अडचण उभी राहते. )

ह्यावर तोडगा असा काढता येईल, की मोक्ष हे त्याच्या शुद्ध आणि परिपूर्ण स्वरूपात व्यक्तीला गाठता येईल असे तिचे साध्य असते ही कल्पना आपण सोडून द्यावी. ज्या अवस्थेच्या शक्य तितक्या जवळ जवळ जावे, म्हणजे ज्या अवस्थेशी अधिकाधिक समान ठरेल असे रूप स्वतःच्या अवस्थेला देत जावे, (पण जी अवस्था व्यक्तीने साक्षात प्राप्त करून घेण्याचा प्रश्न उद्भवत नाही कारण ती अवस्था कुणी प्राप्त करून घेतली आहे ही कल्पनाच आत्मविसंगत आहे ) अशी अवस्था म्हणजे मोक्ष. मोक्ष म्हणजे व्यक्तीने जे साक्षात सिद्ध करायचे असे साध्य नव्हे, तर ज्याच्याशी अधिकाधिक सारुप्य साधायचे असे साध्य. मोक्ष साक्षात् प्राप्त करून घेतल्याने व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व जसे नष्ट होते तसे मोक्षाच्या 'जवळ' गेल्याने होत नाही; तिचे व्यक्तिमत्त्व अबाधित राहते. **मोक्षाच्या अधिकाधिक जवळ जाणे** हे व्यक्ती सिद्ध करू शकेल असे

---

* या संपादकीयाचे पहिले तेरा भाग अनुक्रमे जुलै ८८; जाने., फेब्रु., मार्च, एप्रिल, मे, नोव्हेंबर ८९ व मार्च, एप्रिल, मे, जून, जुलै, नोव्हें. ९० या अंकांत प्रसिद्ध झाले होते. हा चौदावा भाग. –संपादक.

साध्य आहे. त्याची आणि धर्म-अर्थ-काम ह्यांची सांगड घालता येईल.

पण येथे दुसरी अडचण उपस्थित होते. मोक्षाच्या जवळ येणारी ही जी अवस्था आहे तिचे स्वरूप काय असेल ? अद्वैताच्या दृष्टीने जे मुक्त आहे ते म्हणजे ब्रह्म. तेव्हा मोक्षाच्या जवळ येणारी अवस्था म्हणजे ब्रह्मासारखी अवस्था. आता ब्रह्म हे परिपूर्ण आहे. त्याला काही साध्य नाही, त्याला इच्छा-आकांक्षा, प्रेरणा असे काही नाही. म्हणजे जो साधायचा आहे असा कोणताही पुरुषार्थ ब्रह्माला नाही. तेव्हा व्यक्तीची ब्रह्मासारखी अवस्था म्हणजे ज्या अवस्थेत व्यक्तीला कमीत कमी साध्ये उरतात अशी अवस्था. अशी अवस्था प्राप्त करून घेणे हे व्यक्तीचे ( ह्या नवीन अर्थाने ) मोक्ष हे साध्य होय. अशा मोक्षाची धर्म-अर्थ-कामाशी सांगड घालता येईल का ?

धर्म, अर्थ आणि काम ह्यांची परस्परांशी सांगड घालण्यात काही अडचण नसते हे आपण पाहिले आहे. अवघड काय असेल तर त्यांची परस्परांशी सुसंगतपणे सांगड घालून, तिला अनुसरून आयुष्यभर जगणे. एक बुद्धियुक्त प्राणी म्हणून माणसाच्या ज्या स्वाभाविक इच्छा-प्रेरणा असतात त्या म्हणजे काम हा पुरुषार्थ– उदा., भूक, लैंगिक वासना, वात्सल्य, ज्ञानार्जनाची इच्छा इत्यादी. कामतृप्तीसाठी भौतिक साधने आवश्यक असतात आणि त्यांची निर्मिती करावी लागते, म्हणजे अर्थार्जन करावे लागते, म्हणून काम व अर्थ ह्यांचा समन्वय साधावाच लागतो. नाही तर काम अतृप्त राहील. माणसांना समाजात एकत्र नांदून अर्थ-काम साधावे लागतात व म्हणून धर्म आवश्यक असतो. धर्माची दोन रूपे आहेत. धर्म म्हणजे सामाजिक न्याय. मला ज्याप्रमाणे माझ्या अर्थ-कामाचे महत्त्व आहे त्याप्रमाणे इतर प्रत्येकाला स्वतःच्या अर्थ-कामाचे महत्त्व असते ही जाणीव बाळगून इतरांच्या अर्थकामाच्या साधनेच्या आड न येता आपापला अर्थ-काम प्रत्येकाने साधण्यात प्रत्येकाचा धर्म असतो. हे धर्माचे एक रूप. ह्याला सामाजिक धर्म म्हणू. धर्माचे दुसरे रूप म्हणजे साधारण धर्म. आत्मौपम्य बुद्धीने इतर कुणाचेही कल्याण हे माझे साक्षात् साध्य आहे ह्या वृत्तीने जगणे म्हणजे साधारणधर्म पाळणे. अहिंसा, (जीवमात्राविषयीची) करुणा, मैत्री इ. ही साधारणधर्माची रूपे आहेत.

सामाजिक धर्म पाळण्यात स्वतःविषयीची एक प्रकारची तटस्थता किंवा अलिप्तता अंतर्भूत असते. माझ्या अर्थ-कामाला माझ्या दृष्टीने जे महत्त्व असते ते इतर प्रत्येकाच्या दृष्टीने त्याच्या त्याच्या अर्थ-कामाला असते हे मी ओळखतो ह्याचा अर्थ मी स्वतःकडे अनेकांपैकी (केवळ) एक म्हणून पाहतो. मी स्वतःमध्ये बुडून गेलेला नसतो. स्वतःकडे (आणि इतरांकडे) मी वैश्विक (universal) दृष्टीने पाहतो. ( ही एक प्रकारची 'रॅशनॅलिटी' आहे. भारतीय परिभाषेत ही दृष्टी, सत्त्वगुणांच्या उत्कर्षामुळे होते अशी मांडली जाते हे आपण पाहिले आहे.) कामामध्ये, आपल्या स्वाभाविक इच्छा-प्रेरणांमध्ये एक प्रकारची उत्स्फूर्तता आणि निरागसता असते. ह्या इच्छा-प्रेरणा एकाग्र असतात, स्वतःचे समाधान साधण्यासाठी त्या व्यक्तीला अनिर्बंधपणे रेटत असतात. स्वतःपलीकडे त्या पाहत नाहीत. त्यांच्या समाधानासाठी 'अर्था'र्जनाची आवश्यकता असते ह्या जाणिवेतून त्यांच्याविषयीची, एक प्रकारची, तटस्थता प्रथम निर्माण होते. ज्या इच्छेच्या तृप्तीसाठी आवश्यक तो 'अर्थ' संपादन करता येत नाही तिची अतृप्ती सहन करण्याची, म्हणजे त्या इच्छेला आवर घालण्याची शिस्त माणसाला पाळावी लागते. एखाद्या माणसाची एखाद्या विशिष्ट वेळेची इच्छा म्हणजे त्या वेळेची त्या माणसाची संपूर्ण अवस्था असे असत नाही. त्या इच्छेविषयीचा, ती तृप्त करावी की नाही असा निर्णय माणूस घेतो आणि ह्या अर्थाने तो तिच्यापासून अलिप्त असतो.

पण माणूस जेव्हा सामाजिक धर्माच्या चौकटीत स्वतःचा अर्थ-काम साधू पाहतो तेव्हा त्याच्याविषयीचा एका वेगळ्या प्रकारचा अलिप्ततेचा भाव त्याच्या वृत्तीत असतो. त्याच्या 'अहंकारा'ला– अहंकेंद्रीपणाला– त्याने जाणीवपूर्वक मर्यादा घातलेली असते. स्वतःच्या अर्थ-कामाविषयीची स्वाभाविक आसक्ती आणि वैश्विक दृष्टीत अंतर्भूत असलेली तटस्थता ह्यांचा मेळ त्याच्या जीवनसरणीत झालेला असतो. आता माणूस जेव्हा साधारण-धर्म पाळतो तेव्हा तो सामाजिक धर्मात अनुस्यूत असलेल्या वृत्तीपलीकडे जातो. इतरांसारखाच आणि इतरांएवढाच मी आहे, मी कोणी विशेष किंवा अधिक नाही असे तो मानीत नाही. इतरांचे कल्याण– धर्म-अर्थ-काम–हेच माझे साध्य आहे असे तो मानतो. इतरांच्या कल्याणात मी माझे कल्याण पाहतो ह्याचा अर्थ





इतरांच्या कल्याणाच्या रूपात मी माझे कल्याण साधू पाहतो असा नव्हे तर माझ्या कल्याणाचा—अर्थ-कामाचा—विचार सोडून देऊन, इतरांचे कल्याण हेच मी माझे साध्य बनवितो. साधारणधर्माचे परिपूर्णतेने पालन करायचे तर अहंकाराचे—अहंकेंद्रीपणाचे—पूर्णपणे विसर्जन केले पाहिजे. सामाजिक धर्म अहंकाराला मर्यादा घालतो. साधारणधर्म अहंकाराचे निर्मूलन करू पाहतो. मोक्षाचे एक अंग म्हणजे अहंकारापासूनची मुक्तता हे असते हे आपण पाहिलेच आहे. तेव्हा साधारणधर्म हा मोक्षधर्म आहे.

माणसाला स्वाभाविकपणे इतर माणसांविषयी प्रेम, आपुलकी वाटते, त्यांच्या दुःखाविषयी कळवळा वाटतो. तितक्याच स्वाभाविकपणे त्याला त्यांच्याविषयी भीती, द्वेष, आशंका वाटत असते. इतर आपल्या स्वार्थांच्या आड येऊ शकतील ह्या विचारावर भीती किंवा द्वेष आधारलेला असतो. तेव्हा स्वार्थाचे किंवा अहंभावाचे पूर्णपणे शमन करू पाहणाऱ्या साधारणधर्मामध्ये भीती—द्वेष इत्यादींना स्थानच नसते. पण प्रेम, आपुलकी, जिव्हाळा इत्यादी आपल्या ज्या नैसर्गिक भावना आहेत, त्या आहेत त्या स्वरूपात साधारणधर्मात वसत नाहीत. कारण त्यांच्या स्वाभाविक स्वरूपात त्या आप-पर-भावाने, जवळचा—दूरचा ह्या भेदाने डागळलेल्या असतात. आपल्या स्वार्थाविषयीच्या कल्पनेच्या परिघात ज्या व्यक्ती येतात त्या आपल्या आणि इतर परक्या असा हा भेद असतो. साधारणधर्मात सर्वांच्या कल्याणाविषयी तितकीच उत्कट आस्था असते; समदृष्टी असते. ह्या आस्थेतील उत्स्फूर्तता आणि वैश्विक दृष्टीतील अलिप्तता ह्यांचा मेळ साधारणधर्मात घातला जातो. सर्वांच्या कल्याणाविषयीच्या समान आस्थेला **सर्वभूतहितरति** म्हणतात. तेव्हा साधारणधर्म म्हणजे वेगळ्या, उच्चतर पातळीवरील, अहंकाराच्या पलीकडे असलेल्या पातळीवरील, धर्म—अर्थ—काम असतो असे म्हणता येईल. ह्यातील 'काम' हा अहंकाराच्या अधिष्ठानापासून, जोखडापासून मुक्त झालेला काम असतो.

शारीरिक अवस्था आणि प्रेरणा, इंद्रियानुभव ह्यांच्याशी संलग्न असलेल्या कामतृप्तीला, म्हणजे आपल्या नेहमीच्या प्राकृतिक जीवनातील कामतृप्तीला ह्या जीवनसरणीत स्थान असते की नाही ? साधारण-धर्माचे पालन करणारा माणूस अखेरीस शरीरधारी असतो. ह्याचे उत्तर असे की, त्याला कामतृप्तीचा अनुभव असतो पण कामतृप्ती हे त्याचे कधीही साध्य नसते. अशा साधकाला जेव्हा भूक लागेल तेव्हा जर त्याला रुचकर अन्न लाभले तर त्याच्या आस्वादाच्या आणि भूक भागण्याच्या अनुभवाचा आनंद त्याला जरूर प्राप्त होईल. पण रुचकर अन्न तो शोधीत बसणार नाही आणि बेचव अन्न प्रसंगी लाभले तर खंत पावणार नाही. शरीर हे धर्मसाधन असल्यामुळे ते निरोगी राखण्याचा तो प्रयत्न करील (सर्वच गोष्टी संभाव्य धर्मसाधने असल्यामुळे आपल्याशी संबंधित असलेल्या सर्व गोष्टींची तो निगा घेईल.). आणि स्वतःच्या निरोगी शरीराचा जो स्वास्थ्याचा आणि टवटवीतपणाचा आनंदमय आंतरिक अनुभव माणसाला येतो तो त्याला येईल. पण आवश्यक तेव्हा आपल्या आरोग्याचा आणि प्राणाचाही बळी द्यायला तो सहजी तयार होईल. त्याची कामतृप्ती अशी अपाततः होणारी असेल. ती प्रयत्नपूर्वक होणार नाही.

आणखी एका अंगाने कामतृप्तीला ह्या जीवनसरणीत स्थान लाभेल असे मला वाटते. इतर माणसांच्या कल्याणाविषयी आस्था असणे म्हणजे त्यांना धर्म-अर्थ-काम प्राप्त व्हावेत अशी आस्था असणे. त्यांनी धर्मात स्थिर राहून अर्थ-काम साधावा ह्यासाठी त्यांना शक्य ते साहाय्य करण्यात ही आस्था दिसून येते. आता व्यक्तीला आपल्या परिसराचे अधिक सूक्ष्म, सुव्यवस्थित ज्ञान झाले तर अर्थार्जन करण्याची तिची शक्ती वाढते. समजा, अशा ज्ञानात भर घालण्याची शक्ती माझ्या अंगी आहे. समजा, तिचा वापर करून, मी वस्तूंचे निरीक्षण केले, एखाद्या प्रकारची घटना कशी घडते ह्याची अटकळ ह्या निरीक्षणांच्या आधारे बांधली, तिच्यापासून काही अनुमाने केली, ही अनुमाने सत्य ठरतात ह्याची प्रचीती पुढील निरीक्षणांच्या साहाय्याने घेतली आणि एखादा नवीन सिद्धान्त सिद्ध केला. आता ह्या प्रयत्नात कष्ट असतात पण ती आनंदमय अशी बौद्धिक क्रीडाही असते. म्हणजे ही एक प्रकारची कामतृप्ती असते. साधारणधर्माच्या साधकाच्या जीवनात अशा कामतृप्तीला स्थान असते. पण, परत, ही कामतृप्ती स्वतंत्रपणे त्याचे साध्य नसते. इतरांच्या धर्म-अर्थ-काम-साधनेला साहाय्य करणे हेच त्याचे साध्य असते आणि स्वतःच्या अंगी जी एक विशिष्ट शक्ती आहे तिची जोपासना करणे आणि वापर करणे हे ह्या साध्याचे साधन असते. अशी जोपासना आणि वापर करण्यात

अनुक्रमणिका

जो आनंद असतो त्याला साधकाच्या जीवतात आनुषंगिक स्थान असते.

पारंपरिक परिभाषा वापरून असे म्हणता येईल की, ह्या स्वरूपाची ज्ञानसाधना 'सात्त्विक' असते. बौद्धिक क्रीडेचा आणि बौद्धिक क्रीडेतील यशाचा आनंद हे एक स्वतंत्र साध्य म्हणून स्वीकारून ते प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करणे ही 'राजस' ज्ञानसाधना होय. स्वतःच्या स्वार्थाचे, संपत्ती किंवा सत्ता वृद्धिंगत करण्याचे साधन म्हणून ज्ञानाची साधना करणे ही 'तामस' ज्ञानसाधना असते. मोक्षसाधनेत सात्त्विक ज्ञानसाधनेला आणि तिच्याशी निगडित असलेल्या सात्त्विक कामतृप्तीला स्थान असते. अशा सात्त्विक ज्ञानसाधनेभोवती एखाद्या व्यक्तीची मोक्षसाधना गुंफलेली असेल. अन्य कुणाची सात्त्विक कलासाधनेभोवती, कुणाची सात्त्विक वृत्तीने शेती करण्याभोवती गुंफलेली असेल.

साध्ये सिद्ध करण्याच्या माणसाच्या शक्तीला मर्यादा असते हे ज्ञान माणसाला व्यवहारात उतरल्यावर लवकरच होते. इतरांचे कल्याण साधण्यासाठी झटत असताना साधकाला त्याच्या प्रयत्नात अनेकदा अपयश येईल. ह्याचे दुःख त्याला होईल की नाही ? त्याला स्वाभाविकपणे दुःख होईल. पण, इतरांचे कल्याण साधले गेले नाही ह्याचे ते दुःख असेल; मला अपयश आले ह्याचे ते दुःख असणार नाही. अहंकाराचे अधिष्ठान असलेल्या इच्छेचे समाधान करण्यात जर अपयश आले तर त्यातून निर्माण होणाऱ्या दुःखात तगमग असते; स्वतःच्या मर्यादांविरुद्धची एक फोल अशी बंडखोरी असते. माणसाचा तोल त्याने ढळू शकतो. तो निराशेने ग्रस्त होईल किंवा बेभानपणे आततायीपणा करील. साधकाचा यशाचा आनंद जसा खरा पण आनुषंगिक असतो त्याप्रमाणे त्याचे अपयशाचे दुःखही खरे पण आनुषंगिक असते. त्यांनी तो विचलित होत नाही. ही सुखदुःखे अनुभवूनही जणू काय ती अनुभवलीच नव्हती अशा रीतीने सर्वभूतहिताची त्याची साधना अखंडपणे चालू राहते. ह्या अर्थाने साधकाला सुखदुःख, लाभालाभ, जयाजय सम असतात.

मोक्षसाधकाला आदर्श असलेली अशी ही जीवनसरणी आहे. ती तिच्या शुद्ध, परिपूर्ण स्वरूपात आत्मसात करणे हे साधकाचे साध्य असते. ह्या जीवनसरणीत कर्तव्ये आहेत, प्राप्तव्ये आहेत आणि म्हणून कर्मे आहेत, सुख-दुःखाला, मानवी भावनांना स्थान आहे. ही मोक्षसाधना आहे पण तिच्यात धर्म-अर्थ-काम ह्यांची पण साधना अनुस्यूत आहे. तेव्हा तिच्यात मोक्ष आणि धर्म-अर्थ-काम ह्यांचा समन्वय साधला जातो असे म्हणता येईल. अतिशय अवघड पण माणसाला शक्य असलेली अशी ही जीवनसरणी आहे. तरीही एक प्रश्न उरतो. मोक्ष जेव्हा प्रत्यक्षात साधला जातो तेव्हा कोणती अवस्था असते ? (अपूर्ण)





अनुक्रमणिका

# नववा वित्तआयोग

सी. पं. खेर

केंद्र-राज्य वित्तीय संबंधाबद्दलचे, आंतरराष्ट्रीय तुलनेत, भारतीय संविधानाचे खास वैशिष्टच असे, की दर पाच वर्षांनी केंद्र व राज्ये यांच्यात वित्तीय तोल सांभाळता यावा याकरिता वित्तआयोग स्थापला जावा, अशी तरतूद होय. काही केंद्रीय कराच्या महसुलात राज्यांना किती व कोणत्या निकषावर वाटा द्यावा, राज्यांना वित्तीय साहाय्याची जरुरी असेल तर त्यासाठी कोणत्या राज्यांना केंद्रीय अनुदान किती द्यावे हे वित्त-आयोग ठरवितो. असा पहिला आयोग १९५१–५२ मधला तर १९८७–८९ चा नववा वित्तआयोग होय. नवव्या वित्तआयोगाचा १९९०–९५ करिता शिफारस करणारा अंतिम (दुसरा) अहवाल अलीकडेच (१२ मार्च १९५० ला लोकसभेत सादर करण्यात आला) प्रसिद्ध झाला आहे. त्याची चर्चा या लेखात करावयाची आहे.

– २ –

वित्तआयोग ही साचेबंद संस्था नसून ती स्वतःच घडत आलेली, घडत राहणारी, विकास पावत राहणारी संस्था आहे; असेच त्याच्याकडे पाहावयास हवे. त्याच्या स्थापना व कार्यकलापासंबंधीची जी संविधानिक कलमे आहेत त्यांचा परिस्थितीनुरूप अर्थ करणारी, व्यापक अर्थ देणारी ती संस्था आहे.

हे आयोग नेमताना सरकार काही संदर्भ-मुद्दे नमूद करते. पण हे मुद्दे केवळ सूचक असून, काही टीकाकारांना वाटते तसे, विशेषतः अगदी अलीकडच्या आयोगानी, तेवढ्या मुद्द्यापुरतेच स्वतःला बांधून ठेवलेले नाही. किंवा आयोग नेमणाऱ्या संविधानाच्या २८० व्या कलमानेही त्यावर कोणत्या मर्यादा घातलेल्या नाहीत. आपला दृष्टिकोण व कार्यपद्धती ठरविण्यास वित्तआयोग पूर्णपणे स्वतंत्र आहे. राष्ट्रपतींच्या अध्यादेशात संदर्भ-मुद्दे नमूद करताना "अन्य गोष्टीं-बरोबर पुढील मुद्द्यांवर विचार व्हावा" असे सर्व-साधारणपणे म्हटलेले असते.



नवव्या वित्तआयोगाच्या अध्यादेशात मात्र असा शब्दप्रयोग गळला गेलेला आहे. तो अनवधानाने गळला गेला असावा. त्यामुळे त्यातील संदर्भ हा राष्ट्रपतींचा आदेश आहे असे समजले जाईल व तेवढ्याने घटनेत नसलेली बंधने पडतील अशी टीका झाली होती.[१] अशी टीका तात्त्विक स्वरूपाची असून व्यवहारतः ती गैरलागू ठरली आहे असे केंद्र-राज्यसंबंधाचा विचार करणाऱ्या सरकारिया समितीने म्हटले आहे. सरकारने भाषा वापरताना इतकी काळजी घ्यायला हवी, की त्यामुळे वित्तआयोगावर संदर्भ-मुद्द्यांचे बंधन पडले आहे असे वाटता कामा नये असेही या समितीने नमूद केले आहे.[२]

वित्तआयोगाने वित्तसाहाय्याची गरज असणाऱ्या कोणत्या राज्यांना केंद्राने किती अनुदान द्यावे याची संविधानाच्या २७५ (१) या कलमाखाली शिफारस करावयाची आहे. परिणामी राज्यांच्या **तुटीची** भरपाई करण्याचे काम वित्तआयोगाकडे आलेले आहे. पण त्याने योजनेतर खर्चामुळे येणाऱ्या, का (२) योजनांतर्गत खर्चामुळेसुद्धा येणाऱ्या महसुली तुटीचा आणि (३) भांडवली तुटीचादेखील विचार करावा याबद्दल आयोगाआयोगांतून मतभिन्नता आढळते.

योजनांतर्गत विनियोगामुळे येणाऱ्या तुटीचा विचार केल्यास आपण योजनाआयोगाच्या कार्य-क्षेत्रावर आक्रमण केल्यासारखे होते की काय अशी शंका वित्तआयोगांना भेडसावीत होती.

वित्तआयोगाला जसा संविधानाचा (कलम २८० चा) मूलाधार आहे तसा योजनाआयोगाला नाही. योजनाआयोग प्रशासकीय आज्ञेने कार्यवाहीत आलेला आहे. त्यामुळे योजनाआयोगावर केंद्र सरकारचे वर्चस्व आहे, व तो स्वायत्त नाही. ही एक त्रुटी आहे असे काही टीकाकारांना वाटते. वास्तविक या टीकेत फारसे तथ्य नाही. संविधानात विविध कलमे अशी आहेत, की भारताचा विकास नियोजनपूर्वक व केंद्र आणि

अनुक्रमणिका

राज्यांच्या सहकार्यानेच व्हावा. भारतीय संविधान हे सहकारी संविधान आहे. तसेच योजनाआयोगाच्या सूचनेवरून त्याला सल्ला देण्यास राष्ट्रीय विकास मंडळाची स्थापना झालेली आहे. या विकास मंडळात राज्यांचे मुख्यमंत्रीही असतात. त्यामुळे योजनाआयोग राज्यांचे हितसंबंध डावलतो असे म्हणता येत नाही. आणखी असे, की योजनाआयोगाच्या अध्यक्षपदी पंतप्रधान व केंद्रीय अर्थमंत्री हे त्याचे सदस्य असल्या-मुळे त्याला एक दर्जा व अधिकार मिळालेला आहे. योजना केवळ तज्ज्ञांची असत नाही. तिला राजकीय आधार लागतो. केंद्र व राज्य सरकारांची बांधिलकी असावी लागते. म्हणजे योजनाआयोग हा स्वायत्त असू शकत नाही. केवळ सल्लागार राहू शकत नाही. कारण जो सल्ला अमलात येण्याची जिथे खात्री असत नाही तो सल्ला कुचकामाचा होय.

ते कसेही असले तरी, आणि नवा योजनाकाल सुरू होण्याआधी वित्तआयोग नेमण्याचा पायंडा सुरू केला गेल्याने वित्तआयोगाच्या शिफारशी लक्षात घेऊन योजनेचा आराखडा तयार करण्यात येऊ लागला आहे.

योजनाआयोगाच्या विकासापायी राज्यांना होणारे वित्तीय हस्तांतर संविधानाच्या २८२ व्या कलमा-नुसार होते. २८२ वे कलम 'अवशिष्ट वित्तीय तरतुदी' या सदराखाली येते. त्यामुळे त्यावर आजच्याएवढा भर देणे योग्य आहे काय? सगळी केंद्रीय अनुदाने २७५ (१) या कलमाखाली का दिली जाऊ नयेत? यामुळे योजनाआयोग संविधानिक वित्तआयोगावर कुरघोडी करीत नाही काय? २८२ व्या कलमा-खालील अनुदानेही केंद्र सरकारच्या इच्छेनुसार (म्हणजे लहरीनुसार) होणारी नाहीत काय? असे प्रश्न उपस्थित केले गेले आहेत.

आता हे खरे आहे, की सुरुवातीच्या सालांत (१९५१–५५) एकूण हस्तांतरणात (केंद्र-करात वाटा, अनुदाने व कर्जे) योजनाआयोगाचे हस्तांतरण सर्वाधिक म्हणजे ६१·५ टक्के, अन्य ७·३ टक्के तर वित्तआयोगातर्फे ३१·२ टक्के असे प्रमाण होते. परंतु पुढे ते कमी झालेले आहे. १९६९–७४ या काळात हे प्रमाण सर्वांत कमी म्हणजे ३१·३ टक्के पडले. पण ही घट अन्य हस्तांतरणांनी (३२·८ टक्के) भरून निघाली. १९५१ ते १९८५ एवढा काळ घेतला तर सरासरीने योजनाआयोग व वित्तआयोग यांच्यातर्फे होणारे हस्तांतरण जवळजवळ समसमान असून १९८५–८९ या काळातही ते समान (म्हणजे प्रत्येकी ४१·७ टक्के) (तक्ता क्र. ७ लेखाच्या शेवटी पहा) राहिलेले आहे.

योजनाआयोगाच्या हस्तांतरणात १९८५–८९ या काळात अनुदाने २४ टक्के, कर्जे १७·७ टक्के, तर वित्तआयोगाच्या हस्तांतरणात केंद्र-करातला वाटा ३५ टक्के तर अनुदाने ६·७ टक्के असे प्रमाण पडते.

इथे एक गोष्ट ध्यानात ठेवावयास हवी. वित्त-आयोगाच्या हस्तांतरणात केंद्रीय करातील वाटचाचे (हक्काचे) प्रमाण जास्त राहावे, अनुदानांचे प्रमाण कमीतकमी असावे (केंद्रीय अनुदानावर आपण जगतो आहो अशी राज्यांची भावना होऊ नये म्हणून) अशी राज्यांचीच मागणी होती व ती योग्यच होती. योजनाआयोगाचे हस्तांतरण हे गाडगीळ-सूत्रानुसार होत असते व हे सूत्र राष्ट्रीय विकास मंडळाने मान्य केलेले आहे. या सूत्रानुसार काही ठरावीक निकषां-वरच राज्यांना अनुदान (व कर्जे) मिळत राहते. यात केंद्र सरकारच्या स्वेच्छेला फारच थोडा (योजना-आयोगाच्या हस्तांतराच्या १० टक्के) वाव उरला आहे. केंद्र सरकारला राज्यांच्या अकल्पित परिस्थितीतून वाट काढण्यासाठी २८२ व्या कलमात असलेला एवढा लवचीकपणा राखायलाच हवा.

संविधानाच्या २७५(१) व २८२ या कलमांच्या व्याप्तीबद्दल कायदेतज्ज्ञांत मतभेद आहेत. सगळी अनुदाने २७५(१) या कलमाखाली द्यावीत येथपासून तो २८२ व्या कलमाचा आतासारखा उपयोग करता येत नाही येथपर्यंत हे मतभेद पसरलेले आहेत.

व्यावहारिक दृष्ट्या पाहता या कलमांच्या मर्यादित आधाराने केंद्र सरकारने आपल्या अनुदानांचा संकोच केला काय व त्यामुळे केंद्र–राज्य वित्तीय तोल ढासळला काय एवढाच प्रश्न उरतो. १९५१–८५ या ३५ वर्षांच्या अवधीत सरासरीने, हस्तांतरणानंतर, केंद्र व राज्ये यांचा महसूल व भांडवलवसूल मिळून एकूण जमेच्या ४८·८ टक्के केंद्राकडे तर ५१·२ टक्के राज्याकडे जमा उरली. हाच कल पुढेही दिसून येतो. याचा एवढाच अर्थ आहे, की हस्तांतरणाने राज्यांचे पारडे जड झाले आहे आणि वित्तआयोगाच्या एकूण हस्तांतरणाचे जर प्रमाण कमी झाले तर ते २८२ व्या कलमाखाली भरून निघालेले आहे. केंद्राकडून येणारा

वित्तीय ओघ २७५(१) या कलमाखाली असो की २८२ दोन्हीही राज्यांच्या विकासाचा स्तर ठरविण्याकरिता वळत राहिलेला आहे.

वित्तआयोगांच्या २७५(१) या कलमाखालील अनुदानांचे प्रमाण कमीअधिक होण्याचे एक कारण असे, की या कलमांच्या अर्थाबद्दल वित्तआयोगांना असलेला संशय होय. वित्तआयोगाने राज्यांची योजनेतर महसुली तूट तेवढीच भरून काढावी, का योजनांतर्गत महसुली तुटीचाही विचार करावा, तसेच भांडवली तुटीचा विचार करावा का कसे याबद्दल हा संशय आहे. पण असा संशय योग्य नाही हे एव्हाना स्पष्ट झालेले आहे.

चवथ्या वित्तआयोगाचे मत पुढीलप्रमाणे होते :

"योजनांतर्गत आणि योजनेतर विनियोग असा भेद संविधान करीत नाही. आणि राज्यांच्या एकूण महसुली खर्चाचा विचार वित्तआयोगाने करणे हे घटनाबाह्य ठरत नाही. संविधानाच्या २७५(१) च्या पहिल्या परंतुकात (प्रोव्हिझो) "भांडवली आणि आवर्ती (रिकरिंग) रकमा" असा जो उल्लेख आहे त्यामुळे भांडवली खर्चदेखील वित्तआयोगाच्या परिशीलनाच्या कक्षेबाहेर ठेवण्याची आवश्यकता नाही." या अर्थाविष्काराला सातव्या वित्तआयोगाने पुढीलप्रमाणे दुजोरा दिलेला आहे :

"(२७५व्या) कलमातील परंतुकाने वित्तआयोगाला महसुली तसेच भांडवली स्वरूपाची अनुदाने देणे शक्य केले असता या कलमाचा मूळ (परिणामकारी) भाग महसुली खर्चापुरतेच तेवढे अनुदान द्यावे असे सांगतो असे समजणे गैरवाजवी आहे. २७५ व्या कलमाने महसुली खर्चासाठी अनुदान देण्याबरोबरच भांडवली खर्चाकरिताही अनुदानाची शिफारस करण्याची मुभा आहे, याची आम्हाला स्पष्ट जाणीव आहे."[३]

सातव्या व आठव्या वित्तआयोगांनी वेगळावा दाखवून भांडवली अनुदानांची शिफारस केलेली आहे.

योजनाआयोग आर्थिक विकासाच्या दृष्टीने पुढील पाच वर्षांचा विचार करतो. नव्या सुविधा, मत्ता निर्माण करण्यावर त्याचा भर असतो. ज्या सुविधा, मत्ता मागील योजनाकाळात पुऱ्या झाल्या त्यांच्या देखभालीवरील विनियोगाचा विचार करीत नाही. त्यासाठी राज्यांना अधिक महसूल किंवा कर्ज उभे करावे लागते. योजनांतर्गत कार्यक्रमासाठी गाडगीळ-सूत्रानुसार कर्ज मिळते. व त्यावर व्याज द्यावे लागते. काही राज्यांचा त्यांच्या महसुलातून विकासेतर खर्चदेखील भागत नाही. आणि गाडगीळ-सूत्रानुसार मिळणारी कर्जेही अपुरी पडतात. तेव्हा अशी कर्जे विकासेतर खर्चासाठी वळवावी लागलेली आहेत. एकीकडे राज्यांची केंद्राकडून घेतलेली कर्जे वाढली आहेत तर दुसरीकडे त्यावरील व्याजामुळे विकासेतर खर्चही वाढत राहिला आहे. १९७७–७८ ते १९८७–८८ या दहा वर्षांत केंद्राला द्यावयाच्या व्याजाचे राज्यांच्या विकासेतर खर्चातले प्रमाण १९ टक्क्यांवरून २४ टक्क्यांवर येऊन ठेपले. याचा परिणाम विकासासाठी उपलब्ध होणाऱ्या राज्यांच्या महसुलावर होतो. किंवा पुऱ्या झालेल्या प्रकल्पांच्या देखभालीकडे दुर्लक्ष करण्याकडे होतो. त्यामुळे राज्यांच्या विनियोगाची विकासासाठी व विकासेतर, अशी विभागणी करणे कृत्रिम व अहितकर आहे. राज्यांची वित्तीय गरज अजमावताना एकंदर महसुली विनियोगाचा विचार व्हायला हवा.

या दिशेने नवव्या वित्तआयोगाने एक पाऊल पुढे टाकले आहे. त्याने योजनेतर आणि योजनांतर्गत विनियोग असा भेद केला असला तरी योजनांतर्गत खर्चामुळे येणाऱ्या अंदाजित तुटीच्या निम्मी रक्कम अनुदानाने भरून काढण्याची शिफारस केली आहे.

याचा अर्थ असा नव्हे, की नववा वित्तआयोग राज्यांची योजना ठरवतोय. ते काम केव्हाही योजनाआयोगाचेच. परंतु विशेष वर्गात न मोडणाऱ्या राज्याराज्यांतील सामाजिक आणि आर्थिक सेवांच्या दर्जात (व म्हणून त्यांवरील विनियोगात) जी तफावत आढळते ती (पाच वर्षांनंतर) थोडीतरी कमी व्हावी एवढाच त्यामागे हेतू आहे.[४] यातून जर या चार राज्यांची महसुली शिल्लक वाढली तर तिचा उपयोग केव्हाही योजनेचा विस्तार करायला राज्यांना मुभा राहणार आहे.

नवव्या वित्तआयोगाने राज्यांची तूट अजमावताना नवीन पद्धत अवलंबिलेली आहे. (तिचा उल्लेख पुढे येईलच) ही (प्रयोगात्मक) सुरुवात आहे. तिच्यात सुधारणा होत राहणार यात शंका नाही. अशी लवचीकता या संविधानिक कलमात आहे; निदान तशी ती आणायला कोणतीही आडकाठी नाही. अर्थात, ती

कशी, कितपत आणावयाची हे वित्तआयोगाने स्वतःच ठरवावयाचे आहे.

– ३ –

(१) संविधानाने नेमून दिलेल्या काही केंद्रीय करांत राज्यांना किती व कसा वाटा द्यावयाचा व त्यानंतर कोणत्या राज्यांना वित्तसाहाय्याची गरज आहे हे अजमावून त्यांना किती साहाय्य द्यावयाचे हे ठरवून एकीकडे केंद्र व राज्यांचा वित्तीय तोल सांभाळण्याचे व दुसरीकडे राज्याराज्यांमधील विषमता कमी करण्याचे वित्तआयोगाचे काम आहे. याकरिता वित्तआयोगाला–

अ) केंद्र सरकारच्या संरक्षण, ऋणव्यवस्थापन (व्याज व कर्जफेडीचा हप्ता), प्रशासन व खास गरजा यांत्रील खर्चाचा तसेच दायित्वे व हवालती (कमिटेड) विनियोगाचा विचार करायला हवा.

ब) महसूल गोळा करण्यास, वित्तीय शिस्त पाळण्यास, जमा व खर्चाची सांगड घालण्यास आवश्यक ती प्रेरणा शाबूत ठेवायला हवी. सार्वजनिक कार्यक्रम व प्रकल्प गतीने, कार्यक्षमतेने व परिणामकारकतेने अमलात आणण्याची गरज लक्षात घ्यायला हवी.

क) (नवव्या वित्तआयोगाने) केंद्र तसेच राज्यांच्या महसुली जमाखर्चाचा मेळ तर बसावाच पण त्यातून भांडवलगुंतवणुकीसाठी शिल्लक राहीलसे पाहायला हवे.

ड) राज्यांची गरज अजमावताना राज्यांचा पुढील पाच वर्षांतील अंदाजित महसूल व अपेक्षित विनियोग यांची छाननी करावी लागते. राज्ये यासंबंधीचे आकडे देतात. पण ते बऱ्याचदा फुगविलेले किंवा त्रोटक असतात. काही निकष ठरवून ते फेरतपासण्याचे, सुधारण्याचे काम वित्तआयोगाला करावे लागते. नवव्या वित्तआयोगाने याबाबतीत प्रमाणकानुसारी (आदर्शानुसारी–नॉर्मेटिव्ह) दृष्टिकोण स्वीकारावा असे सुचविण्यात आले होते.

(२) भारतातल्या एकूण सरकारी (केंद्र व राज्ये) संकोषात सगळ्या राज्यांच्या मिळून संकोषाचे प्रमाण थोडे चढच पडते हे आपण पाहिले. सर्वसाधारणपणे हाच कल दिसून येतो. १९७४ ते १९८८ या १४ वर्षांत केंद्राचा आवश्यक विकासेतर खर्च वगळता उरलेल्या महसुलात राज्यांना अनुदान रूपाने ५१ टक्के महसूल हस्तांतरित झाला आहे. या चौदा वर्षांत एकंदरीने महसुली तूटच आलेली आहे. ही तूट मुख्यत्वे रिझर्व बँकेकडून कर्जे घेऊन (म्हणजे शेवटी नोटा छापून) भरून काढली जाते. या तुटीच्या अर्थभरण्याचे प्रमाण महसुलाच्या १७.२७ टक्के पडले. तुटीचा अर्थभरणा करण्याचा अधिकार केंद्राचा आहे. (तो वापरणे कितपत योग्य हा प्रश्न अलाहिदा) या अधिकारात किंवा अशा तुटीच्या अर्थभरण्यात वाटा मिळावा अशीही काही राज्यांची मागणी आहे. व ती जणू पुरी झाली आहे. कारण या तुटीचा अर्थभरण्यात २·३७ टक्के भाग राज्यांना दिलेल्या अनुदानामुळे निर्माण झाला आहे.

भांडवलवसुलीत राज्यांना २७·२८ टक्के भाग कर्जरूपाने मिळालेला आहे.

नवव्या वित्तआयोगाच्या शिफारशीनुसार केंद्राकडे विकासार्थ उपलब्ध महसूल (म्हणजे विकासेतर विनियोग वगळता) सगळाच्या सगळा राज्यांना मिळालेला तर आहेच पण अंदाजित महसुली तुटीच्या अर्थभरण्यात २७·५ टक्के भाग राज्यांना उपलब्ध झाला आहे. (तक्ता क्र. ५ लेखाच्या शेवटी पाहा)

(३) राज्याराज्यांमधली वित्तीय विषमता केंद्रीय अनुदानातील (व अंशतः करमहसुलातील) वाटपाची विभागणी करून घालविण्याचा वित्तआयोगाचा प्रयत्न असतो. तो कशा रीतीने केला गेला आहे हे यापुढे पाहू.

एकूण (२५) राज्यांचे चार गट केले जातात. दरडोई उत्पन्नानुसार (अ) अधिक उत्पन्नाचा, पुढारलेला, (ब) मध्यम व (क) किमान उत्पन्नाचा, मागासलेला, सीमेलगतचा, डोंगराळ मागासलेला, विशेष अडचणींचा व म्हणून विशेष वर्गात मोडणाऱ्या राज्यांचा चौथा (ड) गट.

या गटांत मोडणाऱ्या राज्यांना दरडोई हस्तांतरण किती झाले, त्यांची महसुली तूट हस्तांतरणानंतर किती भरून निघाली, म्हणजे महसुली हस्तांतरणापूर्वी किती तूट / शिल्लक होती व हस्तांतरणानंतर किती शिल्लक राहील यांच्या तुलनेने वित्तआयोगाने कोणत्या गटाला किती दरडोई हस्तांतरण केले हे पाहता येते.

आता तुलना करताना किंमतीतील वाढीचा निचरा केल्याने ही तुलना योग्य ठरते. म्हणून दरडोई तूट / शिल्लक यांचे आकडे १९७०–७१ च्या स्थिर किंमतीत व्यक्त करून ते तक्ता क्र. ८ मध्ये लेखाच्या शेवटी दिलेले आहेत. सारांश रूपाने या चार गटांतील राज्यांना



अनुक्रमणिका

वित्तआयोगाच्या महसुली-हस्तांतरणाने दर डोई किती वाढ झाली हे पुढे दिले आहे.

**तक्ता क्र. १**

**हस्तांतरणाने झालेली एकंदर दरडोई वाढ**

(१९७०-७१ च्या स्थिर किमतीत, रुपये)

| राज्यांचा गट | वित्तआयोग सातवा | आठवा | नववा |
|---|---|---|---|
| अ | १५१ | १४७ | ४७ |
| ब | १६१ | १७९ | ६७ |
| क | १७१ | २०० | ७७ |
| ड | ३१२ | ३९१ | २१० |
| एकूण | १७१ | १९४ | ७१ |

यावरून कमी उत्पन्न गटातील राज्यांना अधिक हस्तांतरण करण्याचा वित्तआयोगांचा प्रयत्न स्पष्ट होतो.

विषमता कमी करण्याच्या दृष्टीने वित्तआयोगाचे हस्तांतरण योजनाआयोगाच्या हस्तांतरणापेक्षा अधिक प्रभावी ठरत आहे असेही सांख्यिकीय दृष्टचा आढळून आले आहे.[५]

नवव्या वित्तआयोगाच्या शिफारशीनुसार १६ राज्यांकडे महसुली शिल्लक राहणार आहे. तर विशेष वर्गात मोडणाऱ्या ९ राज्यांची मोठाली महसुली-तूट भरून निघत आहे.

एकूण केंद्रीय हस्तांतरणाचे या राज्यगटातून पुढील प्रमाणात विभाजन झाले आहे.

(तक्ता क्र. २ पृ. ७ वर पहा)

यावरूनही मागासलेल्या राज्यांना वाढत्या प्रमाणात हस्तांतरण झाल्याचे दिसते.

अधिक उत्पन्न असलेल्या राज्यांच्या उत्पादनापासून कमी उत्पन्न असलेल्या राज्यांच्या उत्पन्नात केवढे अंतर आहे (जास्त अंतर हे अधिक मागासलेपणाचे लक्षण), अनुसूचित जातिजमातींचे तसेच शेतमजुरांचे राज्यांच्या लोकसंख्येत किती प्रमाण आहे (वाढते प्रमाण म्हणजे वाढते मागासलेपण) आणि सामाजिक सेवांवर दरडोई होणाऱ्या खर्चाच्या बाबतीत पुढारलेल्या राज्यांपासून इतर राज्यांचे केवढे अंतर पडते असे तीन निकष लावून राज्यांच्या मागासलेपणाचा निर्देशांक काढून राज्यांना दरडोई महसुली हस्तांतरण किती झाले हे पाहून नवव्या वित्तआयोगाने विषमता घालविण्याचा कसा प्रयत्न केला आहे हे पुढील तक्त्यावरून समजून येईल. यात विशेष वर्गात मोडणारी (ड वर्ग) राज्ये वगळली आहेत.

(तक्ता क्र. ३ पृ. ७ वर पहा)

सामान्यपणे अधिक मागासलेल्या राज्यास अधिक हस्तांतरण मिळाले आहे असे म्हणता येईल. ओरिसा, राजस्तान व केरळ ही राज्ये जी अपवाद वाटतात ती त्यांच्या वित्तीय गरजेमुळे होत. केरळात शेतमजुरांचे प्रमाण कमी असल्याने आणि तिथे सामाजिक सेवांवर अधिक खर्च केला जात असल्याने ते पुढारलेले राज्य वाटले तरी त्याचे दरडोई उत्पन्न (कमाल उत्पन्नाच्या मानाने) कमी आहे. याचा विचार हस्तांतरणात उमटलेला दिसतो.

हे हस्तांतरण योग्य आहे की नाही, वित्तआयोगाने विषमता आणखी कमी का केली नाही याबद्दल मतभेद असू शकतात. यासाठी कोणते निकष निवडले जातात यावर व टीकाकारांच्या व्यक्तिनिष्ठ दृष्टिकोणावर हे अवलंबून राहील.

(४) वित्तआयोगाच्या हस्तांतरणानंतर राज्याकडे महसुली शिल्लक उरेल हे नवव्या वित्तआयोगास पाहावयाचे होते. तशी ती उरणारी आहे हे पुढील तक्त्यावरून स्पष्ट होईल.

(तक्ता क्र. ४ पृ. ७ वर पहा)

परंतु केंद्राकडे तूट येणार आहे. ती सरासरीने सालिना ६,१२७ कोटी रुपये राहील. १९७९-८० पासून सतत केंद्रीय अर्थसंकल्पात महसुली (भांडवली-देखील) तूट येत आलेली आहे आणि ती वाढती आहे. १९८०-८१ ते १९८४-८५ या पाच वर्षांत मिळून जेवढी (९,१५८ कोटी रु.) तूट आली त्याच्या जवळ-जवळ दीडपट (१३,३४९ कोटी रु.) १९८९-९० (सुधारित अंदाज) या एका वर्षात अपेक्षिलेली होती. हा गतीने चढत गेलेला कल एकदम कमी होणे अशक्यच आहे. नवव्या वित्तआयोगाच्या गृहितकृत्यानुसार,

| | कोटी रुपये |
|---|---|
| १९९०-९१ | ८,५२० |
| १९९१–९२ | ७,६०० |
| १९९२–९३ | ६,४८० |
| १९९३–९४ | ४,९३५ |
| १९९४–९५ | ३,१०३ |
| | ३०,६३८ |

अशी ही तूट वर्षावर्षाला घटत जायला हवी.

कोणत्याही असल्या प्रस्तावात राजकीय स्थिरता आणि धोरणात्मक दृढता गृहीत असते. एरवी तशी ती गृहीत धरली तरी ( वित्तीय शिस्तीच्या अभावी ) वित्तआयोगाच्या या अपेक्षा केंद्र व राज्ये यांच्याकडून कितपत पुऱ्या होणाऱ्या आहेत हा यक्षप्रश्न आहेच. त्यात ९०–९१ साल गोंधळानेच सुरू झाले आहे.

ज्या गृहितकावर नवव्या वित्तआयोगाने वरील अंदाज बांधले आहेत. त्यांचा यापुढे ऊहापोह करू.

– ४ –

सध्याच्या तुटीचे अर्थकारण आणि कर्जबाजारी-पणा यांच्या पकडीतून केंद्र व राज्य सरकारांनी निसटणे जरुरीचेच आहे. या दोन्हींमुळे पुढील पिढ्यां-नाही आपण भरडून काढीत असतो.

सरकारांनी कर्जे घेतली यात काही चूक असत नाही. विकासासाठी, गुंतवणुकीसाठी कर्जे उभी करावीच लागतात. पण त्यांचा उपयोग नीट व्हावा लागतो. त्यापासून प्रतिफळ मिळत राहावे लागते. प्रकल्प कार्य-क्षमतेने पुरे व्हावे लागतात. मत्ता उभी राहावी लागते. उपयोजिते निर्माण व्हावी लागतात. तसे होत नाही ही खरी अडचण आहे.

राज्यांच्या भांडवली दायित्वाचे आकडे मिळतात, परंतु त्यांच्या एकूण मत्तेचे उपलब्ध नाहीत. राज्यांच्या एकूण भांडवली दायित्वात मार्च १९९० अखेरच्या अंदाजानुसार ६९ टक्के भाग केंद्र सरकारकडून घेत-लेल्या कर्जांचा होता. यात अल्पप्रमाणातली ( ४ टक्के ) राज्यांची अधिकर्ष कर्जे मिटविण्यास दिलेली कर्जे वगळली तर ती बव्हंशी विकास– खर्चासाठी होती. अधिक तपशिलाअभावी योग्य कारणासाठी तिचा उपयोग झाला असे आपण समजू.

केंद्र सरकारची मार्च ९० अखेर कर्जे व दायित्वे २,५९,४२९ कोटी रुपये होती. यांत विकासासाठीची भांडवली गुंतवणूक १,०७,६८६ कोटी रु. राज्य सरकारला व अन्य कर्जे १,००,८३९ कोटी रु. होती.[६] म्हणजे मार्च ९० अखेर (अंदाजे) ५०,९०४ कोटी रु. केंद्र सरकारने महसुली ( उपभोग्य ) खर्चासाठी वापरले ( ऋणं कृत्वा घृतं पिबेत्। ) असे म्हणावे लागते. याचे मात्र वैषम्य वाटते ( वाटले पाहिजे ). मार्च १९७९ अखेरपर्यंत दायित्वापेक्षा मत्ता अधिक होती. परंतु त्यानंतर झपाटचाने दायित्वे व मत्ता यांतील ( ऋण ) अंतर वाढत चालले आहे. ते मार्च १९८५ अखेरच्या ८,०२१ कोटी रुपयांवरून मार्च १९९० अखेर ५०,९०४ कोटी रु. वर येईलसा अंदाज होता. या पाच वर्षांत दायित्वात जेवढी वाढ झाली तिच्या २९·२५ टक्के भागातून कोणतीही उत्पादक गुंतवणूक झाली नाही.

एकूण दायित्वे राष्ट्रीय उत्पन्नाच्या ७५ टक्के होती व १४·७ टक्के दायित्वे अनुत्पादक ठरली होती. याच गतीने गेल्यास राष्ट्रीय उत्पन्नापेक्षा केंद्र सरकारची भांडवली दायित्वे केव्हा अधिक होतील हे सांगता यावयाचे नाही.

कर्जवाढीमुळे महसुलावर वाढत्या व्याजाच्या खर्चाचा ताण पडतो. १९८९–९० च्या अंदाजाप्रमाणे केंद्र सरकारच्या एकूण महसुली खर्चाच्या १६·६ टक्के खर्च ( निव्वळ जमा होणारे व्याज वगळता ) व्याजावर होणारा होता. व १९८०–८१ च्या मानाने ( ७·४८% ) तो दुपटीहूनही अधिक होता.

अनुत्पादक कर्जे, व्याजाचा बोजा (व्याज देण्या-साठीही कर्जे उभी करण्याची कदाचित येऊ शकणारी पाळी) अशा भोवऱ्यातून सरकारने बाहेर पडायला हवे.

राज्य सरकारांना वित्तआयोगाच्या शिफारशीनुसार केंद्राकडून मोठ्या प्रमाणावर हस्तांतरण होत असते. अशा वेळी आपला अर्थसंकल्प शिलकी करावा, महसुली खर्चाचा जमेशी मेळ बसवावा ही राज्य सरकारांची मोठी जबाबदारी आहे. त्यांनीही तुटीचा अर्थसंकल्प करणे हे त्यांच्या आर्थिक गैरशिस्तीचे द्योतक आहे. तुटीचे परिणाम सगळ्या अर्थव्यवस्थेवर होतात. म्हणून ती नियंत्रणाखाली ठेवण्यासाठी एकहाती, केंद्र सरकारच्या कह्यात राहायला हवी.

## तक्ता क्र. २

### नवव्या वित्तआयोगानुसार राज्यगटवार महसुली हस्तांतरणाचे प्रमाण

| राज्यगट | लोकसंख्या | करातील वाटा | अनुदान | एकूण |
|---|---|---|---|---|
| अ. | १८·७२ | १३·७४ | ०·३६ | ११·७९ |
| ब. | २९·४५ | २७·०४ | १९·३२ | २५·९१ |
| क. | ४६·१३ | ४६·५६ | ४७·१५ | ४६·६५ |
| ड. | ५·७० | १२·६६ | ३३·१७ | १५·६५ |
| | १००·०० | १००·०० | १००·०० | १००·०० |

## तक्ता क्र. ३

### राज्यांचा मागासलेपणाचा निर्देशांक व नवव्या वित्तआयोगाचे दरडोई हस्तांतरण

| राज्य | मागासलेपणाचा निर्देशांक | हस्तांतरण प्रचलित किमतीत (रु.) | राज्य | मागासलेपणाचा निर्देशांक | हस्तांतरण प्रचलित किमतीत (रु.) |
|---|---|---|---|---|---|
| १. बिहार | ३०० | २९९ | ८. तामिळनाडू | ४७ | २४० |
| २. उत्तरप्रदेश | २६८ | २८८ | ९. कर्नाटक | ४० | २०१ |
| ३. मध्यप्रदेश | १८६ | २७५ | १०. महाराष्ट्र | १७ | १८२ |
| ४. आंध्रप्रदेश | १४७ | २४६ | ११. गुजरात | ८ | १८९ |
| ५. ओरिसा | ७० | ३८७ | १२. केरळ | ८ | २५० |
| ६. पश्चिम बंगाल | ६७ | २५३ | १३. हरयाणा | ६ | १६३ |
| ७. राजस्तान | ५६ | ३२९ | १४. पंजाब | ५ | १७१ |

## तक्ता क्र. ४

### नवव्या वित्तआयोगाच्या महसुली हस्तांतरणाचे परिणाम (कोटी रुपयात)

| राज्यगट | हस्तांतरणापूर्वी तूट / शिल्लक | हस्तांतरण | हस्तांतरणानंतर तूट / शिल्लक | एकूण वाढ |
|---|---|---|---|---|
| अ. | (+)७,३१२<br>(+१३) | १२,१३१<br>(१२) | १९,४४३<br>(४१) | ४,८१९<br>(३) |
| ब. | (–) १३,६९९<br>(–२५) | २६,६६६<br>(२५) | १२,९६७<br>(२८) | ४०,३६५<br>(२५) |
| क. | (–) ३३,७०६<br>(–६०) | ४८,००२<br>(४७) | १४,२९६<br>(३०) | ८१,७०८<br>(५२) |
| ड. | (–) १५,७७३<br>(–) २८ | १६,१०० <br>(१६) | ३२७<br>(१) | ३१,८७३<br>(२०) |
| एकूण– | (–) ५५,८६६ | १,०२,८९९ | ४७,०३३ | १,५८,७६५ |
| | (१००) | (१००) | (१००) | (१००) |

( टीप : कंसातील आकडे टक्केवारीचे )



अनुक्रमणिका

वित्तीय तूट केंद्र सरकारच्या हाती व कमी होत जाणारी (कारण लगेच महसुली शिल्लक राहणे अशक्य आहे) असावी, व राज्य सरकारांचा अर्थसंकल्प शिलकी राहावा असे दोन हेतू नवव्या वित्तआयोगाने बाळगलेले होते.

यासाठी वित्तआयोगाला पुढील पाच वर्षांत ( १९९०–९५ ) केंद्र व राज्य सरकारांचे ( प्रमाण-कानुसारी ) कर व करेतर उत्पन्न किती असावे, विनियोग किती राहील याचे अंदाज बांधावे लागले आहेत. हे अंदाज त्याने पुढील गृहितकांवर आधारलेले आहेत.

१. योजनाआयोगाने ( आधीच्या ) आठव्या योजनेचा आराखडा तयार करताना स्थूल राष्ट्रांतर्गत उत्पन्न सालिना ६ टक्क्यांनी वाढेल व किंमती ५ टक्क्यांनी वाढतील असे जे गृहितक मानले आहे तेच वित्तआयोगाने स्वीकारलेले आहे.

२. केंद्र सरकारचा सर्व करांपासूनचा महसूल सरासरीने दरसाल १२.८ टक्क्यांनी वाढेल. केंद्रीय वित्तमंत्रालयाने तो १० टक्के दाखविला होता. परंतु १९७४–७५ ते १९८९–९० ( अंदाज ) या पंधरा वर्षांतला वाढीचा कल १४.६४ टक्के आढळतो.

३. करेतर महसूल– सार्वजनिक क्षेत्रातले उद्योग व सार्वजनिक गुंतवणुकीपासूनचे प्रतिफळ– दरसाल ६ टक्के मिळत राहील.

४. योजनेतर महसुली खर्चात ९.७५ टक्क्यांनी वाढ व्हावी. केंद्रीय वित्तमंत्रालयाने हे प्रमाण १३.४७ ते १५.७१ टक्के अंदाजिलेले होते. दीर्घकालीन महसुली विनियोगाचा कल १७.०४ टक्के आहे.

या खर्चात काही क्षेत्रांतून दिले जाणारे धन-साहाय्य मोडते. अन्नधान्याच्या विक्रीत ४.५५ ते ६.३९ टक्के, खताच्या विक्रीत ४.१० ते २७.४४ टक्के तर निर्यातीवर २५ टक्के असे सध्याचे प्रमाण असून यावर वित्तमंत्रालयाच्या अंदाजानुसार पाच वर्षांत ५८,४३३ कोटी रुपये खर्च होईल. विक्री– किंमत वाढवून / सुधारून धनसाहाय्यावर ८ टक्के वाढीची मर्यादा घालावी व एकूण ४७,३३८ कोटींवर ते मर्यादित ठेवावे असे वित्तआयोगाने म्हटले आहे.[७] यासाठी निर्याती-साठीही किती धनसाहाय्य द्यावयाचे याचाही फेरविचार करायला हवा.

संरक्षणखर्च १० टक्क्यांनी वाढावा, व्याजाच्या खर्चात १२% नी वाढ व्हावी. नवी भरती व प्रशासन-खर्च यांवर कडक नियंत्रण हवे ( साहजिकच सरकारी क्षेत्रात रोजगारवाढीला वाव असणार नाही ).

केंद्रीय वित्तमंत्रालयाच्या महसुली जमेच्या अंदाजा-पेक्षा वित्तआयोगाचा अंदाज १०.७ टक्क्यांनी जास्त आहे. तर एकूण महसुली खर्चाचा अंदाज १५ टक्क्यांनी कमी आहे. तुटीच्या अर्थकारणावर बंधन घालावयाचे तर हे आवश्यक आहे व शक्यही आहे. फक्त सर्वत्र निर्धार हवा.

५. राज्यांच्या बाबतीत करांचे उत्पन्न सालिना ११.५ टक्क्यांनी वाढावे अशी वित्तआयोगाची अपेक्षा आहे. परंतु हे एकदम साध्य होणारे नाही याची त्याला कल्पना आहे. निदान १९९४–९५ साली हे प्रमाण गाठले जावे व त्यादृष्टीने आधीच्या वर्षांचे अंदाज सौम्य केलेले आहेत.

६. (अ) वीज व परिवहन मंडळे वगळता अन्य सार्वजनिक उद्योगांपासून त्यांना दिलेल्या कर्जावर २ टक्क्यांपासून सुरुवात करून पाचव्या वर्षी ६ टक्के व्याज मिळावे.

आठव्या वित्तआयोगास अनुसरून सार्वजनिक उद्योगांचे तीन वर्ग करून त्यांपासूनचे पुढीलप्रमाणे प्रतिफल अपेक्षिलेले आहे :

| | |
|---|---|
| १ ) प्रवर्तक (एकूण २७४ संस्था, मार्च ९० अखेर गुंतवणूक १,२०४ कोटी रु.) | प्रतिफलाची काही अपेक्षा नाही. |
| २ ) वित्तीय (९८ संस्था, गुंतवणूक८६६ कोटी रु.) | गुंतवणुकीवर ३ टक्के. |
| ३ ) व्यापारी (४५१ संस्था, गुंतवणूक २,९७७ कोटी रु.) | गुंतवणुकीवर ५ टक्के. |

(ब) सर्व प्रकारच्या सहकारी संस्थांकडून एकूण सरासरीने ३.५ टक्के लाभांश मिळावा (साखर कारखाने, सूतगिरण्या, पतसंस्था व बँका यांच्याकडून ५ टक्के).

७. सिंचनप्रकल्पांच्या देखभालीचा खर्च सिंचन-दराने भरून काढावा. वीज मंडळांनी घसारा व व्याज जाता, १९९०–९१ त ३ टक्क्यांपासून सुरुवात करून १९९४–९५ त ७ टक्क्यांपर्यंत, तर परिवहन मंडळांनी




१ टक्क्यापासून ६·५ टक्क्यांपर्यंत प्रतिफळ मिळवावे. कार्यक्षम देखभाल, गळतीवर काबू व अतिरिक्त नोकरवर्ग कमी करून हे प्रमाण साध्य करणे शक्य आहे.

(याला आणखी एक पुस्ती जोडायला हवी. या मंडळातील कर्मचाऱ्यांच्या संघटनांनी स्वतःचे भत्ते व वेतन वाढवून घेण्यासाठी केवळ न झगडता, जो पगार मिळतो त्याचा योग्य तो मोबदला आपण समाजाला दिला पाहिजे याची जाणीव आपल्या सभासदांना दिली पाहिजे. मागण्यांच्या पाठोपाठ येणारी जबाबदारी उचलली गेली तरच हे शक्य होईल.)

८. सिंचनप्रकल्प, रस्ते, इमारती यांच्या देखभालीवर तांत्रिक दृष्टचा किती खर्च करायला हवा हे जाणून घेऊन जिथे तो आजच्या मानाने भरमसाठ वाटला व जो करणे अशक्य वाटले तिथे तो कमी धरून त्याची राज्यांच्या अंदाजित खर्चात नवव्या वित्तआयोगाने तरतूद केलेली आहे.

सिंचनप्रकल्पाच्या बाबतीत सिंचनाखाली आलेल्या जमिनीवर दरहेक्टरी रु. १८०/- व जी अद्याप सिंचनाखाली आली नाही तीवर दरहेक्टरी रु. ६०/- या प्रमाणाने सिंचनप्रकल्पाच्या देखभालीसाठी तरतूद ठेवली आहे. भाववाढीकरिता ५ टक्के दरसाल तरतूद आहे. डोंगराळ भागातील प्रकल्पाकरिता हे प्रमाण ३० टक्क्यांनी चढ ठेवले आहे.

पाणीसंपत्ती विकास मंत्रालयाने हे प्रमाण सिंचनाखालील जमिनीसाठी दरहेक्टरी रु. २८१/- व सिंचनाखाली नसलेल्या जमिनीसाठी रु. ६०/- देखभालीचा खर्च असावा असे सुचविले होते. आठव्या वित्तआयोगाने ठरविलेल्या रकमेपेक्षा ही रक्कम जवळजवळ तिप्पट होते. त्यामुळे नवव्या वित्तआयोगाने हे प्रमाण नाकारले.

रस्त्यांच्या देखभालीच्या खर्चाचे प्रमाण ठरविताना, नवव्या वित्तआयोगाने, परिवहन विकास मंडळाने १९८८ मध्ये ठरविलेल्या देखभालीवरील खर्चाच्या प्रमाणाचा विचार केला आहे. या मंडळाने रस्त्यांचे प्रकार, दर दिवशी व्यापारी वाहनांची रहदारी व खडीचे दर यांचा विचार करून दर किलोमीटरला दरवर्षी देखभालीवर किती खर्च करावा लागेल याचे प्रमाणक ठरवून दिले आहे. परंतु हे प्रमाणक आजच्या मानाने अतिशय जास्त व राज्यांच्या शक्यतेबाहेरचे आहे. म्हणून आठव्या वित्तआयोगाने व नवव्या वित्तआयोगाने १९८८–८९ करिता जे प्रमाणक ठरविले होते त्याच्या २२० टक्के रकमेच्या खर्चाचा आकडा १९९४–९५ पर्यंत साध्य होऊ शकेल अशा तऱ्हेने व ५ टक्के भाववाढीसाठी तरतूद ठेवून दरसाल हे प्रमाण वाढवीत नेले आहे.



नवव्या वित्तआयोगाने देखभालीच्या खर्चासाठी तरतूद पाहताना कशा तऱ्हेने विचार केला आहे हे समजावे म्हणून ही दोन उदाहरणे दिली. अन्य गोष्टींचा इथे तपशील दिलेला नाही.

९. कर्मचाऱ्यांच्या वेतनात राज्याराज्यांत व केंद्र–राज्यात विषमता आहे. काही राज्यांत केंद्रापेक्षा अधिक तर काही राज्यांत केंद्रापेक्षा कमी वेतन मिळते. जिथे ते कमी आहे अशा आसाम, बिहार, उत्तर प्रदेश, पश्चिम बंगाल या राज्यांतून निदान मूळ पगार केंद्रासमान राहावा व ही विषमता सौम्य करावी अशी खर्चात तरतूद ठेवली आहे.

अशा रीतीने प्रत्येक राज्याकरिता कर व करेतर महसुलाचे तसेच विविध घटकांवरील विनियोगाचे प्रमाणक ठरवून, हे प्रमाणक राज्ये व केंद्र सरकारे पाळतील हे गृहीत धरून, १९९०–९१ ते १९९४–९५ या पाच वर्षांत केंद्र व राज्यांची एकूण महसुली जमा व विनियोग किती होईल व महसुली तूट किती येईल याचे नवव्या वित्तआयोगाने अंदाज बांधले आहेत. या पाच वर्षांत राज्यांना करातला वाटा व अनुदान देण्यापूर्वी केंद्राकडे एकूण १,४९,२७१ कोटी रु. शिल्लक राहील तर राज्यांना ५५,८६३ कोटी रु. तूट येईल असे वित्तआयोगाला दिसून आले.

ही तूट भरून येण्यासाठी राज्यांना केंद्रीय करात किती व कसा वाटा देऊ केला आहे व किती व कसे अनुदान मिळवून दिले आहे हे यापुढे पाहू.

– ५ –

आठव्या वित्तआयोगाप्रमाणेच नवव्या वित्तआयोगाने प्राप्तीकरातील निव्वळ उत्पन्नाच्या आवश्यक वाटचात राज्यांना ८५ टक्के वाटा देऊ केला आहे. उत्पादनशुल्कात निव्वळ महसुलाच्या ४५ टक्के वाटा मिळावयाचा आहे. पण यात आठव्या वित्तआयोगाने ४० टक्के सगळ्यांना व आणखी ५ टक्के खास तुटीच्या राज्यासाठी असे वेगळे वाटले होते. नवव्या वित्तआयोगाने हा भेद काढून टाकला आहे.

अनुक्रमणिका








प्राप्तीकरातील निव्वळ महसुलाचे राज्याराज्यांतून वाटप करताना नवव्या वित्तआयोगाने पुढील प्रमाण ठरविले आहे :

| | टक्के |
|---|---|
| १. १९८५–८६ ते १९८७–८८ या वर्षांत त्या त्या राज्यात झालेली करआकारणी हाच त्या त्या राज्यातून झालेला प्राप्तीकराचा भरणा (कॉन्ट्रिब्यूशन) असे समजून त्यानुसार वाटप. | १०·०० |
| २. १९८२–८५ चे महाराष्ट्र राज्याचे दरडोई राष्ट्रांतर्गत उत्पन्न हे महत्तम उत्पन्न समजून त्यापासून अन्य राज्यांचे दरडोई उत्पन्नाचे केवढे "अंतर" आहे हे काढून, त्याला १९७१ च्या लोकसंख्येने गुणून त्या आधारावर करावयाचे वाटप. | ४५·०० |
| ३. १९७१ च्या जनगणनेनुसार. | २२·५० |
| ४. अनुसूचित जातिजमाती व शेतमजूर यांचे लोकसंख्येशी असलेले प्रमाण पाहून त्यांचा संयुक्तपणे निर्देशांक काढून राज्यांचा मागासलेपणा अजमावून करावयाचे वाटप. | ११·२५ |
| ५. दरडोई उत्पन्न व १९७१ ची राज्याची लोकसंख्या यांच्या गुणाकाराच्या व्यस्त प्रमाणानुसार वाटप. | ११·२५ |
| | १००·०० |

उत्पादनशुल्काच्या निव्वळ महसुलातील राज्यांचा वाटा पुढील प्रमाणात राज्यांना वाटावयाचा आहे.

| | टक्के |
|---|---|
| १. १९७१ ची राज्यांची लोकसंख्या. | २५·० |
| २. १९८२–८३ ते १९८४–८५ या वर्षांतील सरासरी दरडोई उत्पन्नाचे व्यस्त प्रमाण व १९७१ ची लोकसंख्या यांच्या भारान्वित प्रमाणानुसार म्हणजे "प्राप्तीनुसार समायोजित केलेल्या लोकसंख्येनुसार." | १२·५ |
| ३. मागासलेपणाच्या निर्देशांकानुसार. | १२·५ |
| ४. महत्तम उत्पन्नापासूनचे अंतर व १९७१ ची लोकसंख्या यांच्या गुणाकारावर आधारित. | ३३·५ |
| ५. राज्यांना करातील वाटा मिळाल्यावर त्यांना येणाऱ्या महसुली तुटीनुसार. | १६·५ |
| | १००·० |

इतकी सारी कसरत करून एकूण वाटप करावयाच्या (प्राप्तीकर व उत्पादनशुल्क यांच्यासाठी वेगवेगळे) महसुलात २५ राज्यांना मिळू शकणारी टक्केवारी वित्तआयोगाने दिलेली आहे. ती सगळी इथे नमूद करावयाची आवश्यकता नाही.

संविधानाच्या २६९ व्या कलमानुसार काही कर केंद्राने लादावयाचे आहेत. पण त्यांचा सगळा महसूल राज्यांना द्यावयाचा आहे. अशा करांपैकी एक रेल्वे-प्रवासी-भाड्यावरील कर आहे. १९५७ साली असा कर लादलेला होता. परंतु त्यातील व्यावहारिक अडचणींमुळे पुढे तो भाड्यात मिळवला गेला. असा कर वेगळा करता किती उत्पन्न होईल याचा काल्पनिक अंदाज घेऊन त्याचे वाटप वित्तआयोग करीत आला आहे. आठव्या वित्तआयोगाने ठरविलेल्या दरसाल ९५ कोटी रुपयांत नवव्याने वाढ करून सालिना १५० कोटी रु. अशी ही रक्कम ठरविलेली आहे. व राज्यातील रेल्वे-भाडेवसुलीच्या प्रमाणानुसार त्याचे वाटप ठरविलेले आहे.

राज्यांच्या विक्रीकराऐवजी ज्या वस्तूंवर केंद्राने जादा उत्पादनशुल्क लादले आहे. त्या शुल्काच्या महसुलात राज्याचे राष्ट्रांतर्गत उत्पन्न व १९८१ ची लोकसंख्या यांच्या प्रमाणात राज्यांना वाटा मिळावयाचा आहे.

अशा रीतीने १९९०–९५ साठी केंद्रीय करांच्या महसुलात राज्यांना पुढीलप्रमाणे वाटा मिळावयाचा आहे :

| | कोटी रु. |
|---|---|
| १. प्राप्तीकर | २०,९२५ |
| २. उत्पादनशुल्क | ६६,२०७ |
| ३. रेल्वे-प्रवासी-भाड्यावरील कराऐवजी अनुदान | ७५० |
| | ८७,८८२ |

— ६ —

राज्यांना केंद्रीय करातला वाटा देऊ केल्यानंतर राज्यांचा विकासेतर खर्च वगळता ११ राज्यांजवळ ३८,०३२·२५ कोटी रु. शिल्लक तर अन्य १४ राज्यांना ६,०१६·३५ कोटी रु. तूट १९९०–९५ या पाच वर्षांत येईल असा वित्तआयोगाचा अंदाज आहे. ही तूट त्याने केंद्रीय अनुदानाने भरून काढलेली आहे.

नवव्या वित्तआयोगाने सामाजिक व आर्थिक सेवांवरील योजनांतर्गत किमान खर्चाचा अंदाज बांधला आहे.

एकंदर २५ राज्यांत ८ राज्ये ही विशेष गटात मोडतात. या राज्यांना ती डोंगराळ व सीमेलगत असल्याने त्यांच्या विकासार्थ विनियोगासाठी ९० टक्के अनुदान व १० टक्के कर्जे या प्रमाणात केंद्राकडून अर्थसाहाय्य मिळते. वित्तआयोगाने या राज्यांच्या विकास-खर्चामुळे येणाऱ्या तुटीचा विचार केल्यास त्याचे या प्रमाणात होणाऱ्या वित्तसाहाय्यावर प्रतिकूल परिणाम होतील या भीतीने या व्यवस्थेत काही फरक पडता कामा नये अशी त्या राज्यांनी वित्तआयोगास विनंती केली होती. व ती नवव्या वित्तआयोगाने मान्य केली. गोवा, जम्मू, काश्मीर व आसाम यांचा एक वेगळा गट बनतो. तो वगळता उरलेल्या, विशेष वर्गात न मोडणाऱ्या १४ राज्यांचा योजनांतर्गत किमान खर्च ४०,००० कोटी रु. राहील असा वित्तआयोगाने अंदाज केला आहे. त्यात गाडगीळ-सूत्रानुसार १०,००० कोटी रुपये अनुदान मिळू शकेल. राज्यांच्या स्वतःच्या महसुलातून २५,२१२·९१ कोटी रुपये उपलब्ध होणार असून योजनांतर्गत विनियोगामुळे महसुली तूट १७,३४७·२३ कोटी रुपये येईल असे वित्तआयोगाला वाटते. याच्या निम्म्या रकमेइतके या राज्यांना अनुदान मिळावे असे आयोगाने सांगितले आहे. गोव्याला अशी तूट येणार नाही. आसाम आणि जम्मू व काश्मीर यांना एकूण ६५४·४१ कोटी रु. तूट येईल असा अंदाज असून त्याच्या निम्म्या रकमेचे अनुदान त्यांना मिळावयाचे आहे.

तेव्हा राज्यांच्या योजनांतर्गत किमान विनियोगामुळे येणाऱ्या तुटीपायी त्यांना एकूण पाच वर्षांत ९,०००·८३ कोटी रु. अनुदान वित्तआयोगाने देऊ केले आहे.

— ७ —

नवव्या वित्तआयोगाने नैसर्गिक आपत्तीत साहाय्य देण्याची आजवरची पद्धत बदलून टाकली आहे. आजवर अशी आपत्ती (दुष्काळ, झंझावात, पूर इ.) आली, की केंद्र सरकारला मदतीसाठी आवाहन केल्यावर, मग केंद्रीय दल येऊन पाहणी करून, नुकसानीचा अंदाज करून आणि यासाठीचे साहाय्य काही प्रमाणात अनुदान तर बव्हंशी कर्ज म्हणून "आगाऊ योजना-साहाय्य" रूपात दिले जाई व पुढील पाच वर्षांत योजनेसाठी असलेल्या साहाय्यातून मोडून घेतले जाई. ही मोठी कटकटीची पद्धत होती.

या वित्तआयोगाने १९७९–८० ते १९८८–८९ या वर्षांत नैसर्गिक आपत्तिपरिहारार्थ कमाल मर्यादित किती खर्च झाला हे पाहिले. तो सर्व राज्यांसाठी मिळून








अनुक्रमणिका

सालिना ८०४ कोटी रुपये निघाला. एवढ्याचा एक वेगळा निधी उभा करावा, यात पाऊणपट रक्कम केंद्राने व पावपट राज्यांनी भरावी असे सुचविले आहे. या ८०४ कोटी रुपयांत प्रत्येक राज्याचा किती खर्च झाला हे काढले आहे. त्या सरासरी वार्षिक खर्चाच्या पाऊणपट रक्कम केंद्राने भरावी व पावपट राज्याने भरावी. असा निधी राज्यांनीच हाताळावयाचा आहे. महाराष्ट्राकरिता हा वार्षिक निधी ४४ कोटी रुपयांचा आहे. यासाठी केंद्र ३३ कोटी रु. देईल व राज्याने वर्षाला ११ कोटी रु. प्रमाणे पाच वर्षांपर्यंत ते भरावयाचे. एखाद्या वर्षी निधीपेक्षा विनियोग जास्त होणार असेल तर केंद्र त्यापुढील वर्षी द्यावयाच्या रकमेच्या पावपट रक्कम (८·२५ कोटी रु. महाराष्ट्रासाठी) आगाऊ देऊ करेल. पाच वर्षांच्या शेवटी राज्याच्या या निधीत जी रक्कम शिल्लक राहील ती त्याला पुढील पंचवार्षिक योजनेसाठी वापरता येईल.

– ८ –

राज्यांच्या कर्जांचा नवव्या वित्तआयोगानेदेखील विचार केलेला आहे. अरुणाचल प्रदेश, गोवा, मिझोराम यांना राज्यांचा दर्जा मिळाला आहे. तसा त्यांना तो आधीच मिळाला असता तर गाडगीळ-सूत्रानुसार ज्याप्रमाणे विकासार्थ कर्जे मिळाली असती त्याहून जास्तीची १९८६–८७ पर्यंतची कर्जे (१९१ कोटी रु.) माफ करण्यात आली आहेत. १९८६–८७ ते १९८८-८९ ही काही राज्यांतून भीषण दुष्काळाची. यापायी वार्षिक योजनेवरील खर्चाच्या पाच टक्क्यांहूनही अधिक रक्कम केंद्राला द्यावी लागली. त्यातील निम्मी त्याने कर्ज म्हणून दिलेली होती. ही सर्व कर्जाऊ रक्कम (१९८·८८ कोटी रु.) माफ करण्यात आली आहे. भोपाळ वायूपीडितांच्या वैद्यकीय आणि पुनर्वसनासाठी मध्यप्रदेशला केंद्राने ९१.६२ कोटी रू. कर्जाऊ दिले होते. ते माफ करण्यात आले आहेत.

योजनाविकासासाठी दिलेल्या कर्जांची फेररचना केली गेली आहे. त्यामुळे १९९०–९५ या काळातला राज्यांचा परतफेडीचा बोजा (४९४·१२ कोटी रु. नी) थोडा हलका झाला आहे.

– ९ –

वित्तआयोगांना आवश्यक ती माहिती मिळत नाही. ही माहिती सतत गोळा करीत राहण्यासाठी एक कायमचा विभाग स्थापन करावा अशी वित्तआयोगांची सतत मागणी आहे. तिचा पुनरुच्चार नवव्या वित्तआयोगानेही केला आहे.

असा विभाग अलीकडेच स्थापन केला गेला असल्याचे वित्तमंत्रालयाने सरकारिया समितीला कळविलेले होते. परंतु सरकारिया समितीच्या मते हा विभाग योजनाआयोगाशी जोडला जावा, कारण तिथे वार्षिक योजना ठरविताना प्रत्येक राज्याच्या राजकोषाची छाननी होत असते. त्याचा फायदा या विभागाला मिळू शकेल. तसेच वित्तआयोगांच्या शिफारशी कितपत अमलात आल्या हेही पाहता येईल. सरकारिया समितीने पुढे असेही सुचविले आहे, की योजनाआयोगातील वित्त-विभाग ज्या सभासदाकडे असेल त्याच सभासदाला वित्तआयोगाचा सभासद करू द्यावे. म्हणजे योजनाआयोगाचा वार्षिक चर्चेतून जो दृष्टिकोण तयार झाला असेल त्याचा फायदा वित्तआयोगाला मिळू शकेल.

वित्तआयोगाच्या शिफारशी काही मूलभूत (करमहसुलात व महसुली खर्चात त्याची प्रमाणके अमलात येतीलशा) अपेक्षांवर आधारलेल्या असतात. या अपेक्षा पुऱ्या केल्या जात आहेत की नाही हे पाहण्याची वास्तवात कोणतीही यंत्रणा नाही. हे काम योजनाआयोगात व्हायला हवे. मुख्य म्हणजे राज्यांनी आपला अर्थसंकल्प शिलकी राखावा व केंद्राची तूट कमी कमी होत जायला हवी. याची अंमलबजावणी काटेकोरपणे व्हायला हवी.

वित्तीय तूट किती झेपेल, किती करणे योग्य ठरेल हे केंद्राने रिझर्व बँकेशी चर्चा करून ठरवायला हवे. कर्जाबद्दलही अशीच चर्चा आवश्यक आहे. या चर्चेत ठरविलेल्या, प्रमाणाहून तूट वाढेल असे केंद्र सरकारला वाटले तर त्यासाठी केंद्राने लोकसभेची आगाऊ संमती घ्यायला हवी. हा वित्तीय शिस्तीचा भाग आहे.

वित्तीय शिस्त केंद्र आणि राज्ये या दोघांनीही पाळायला हवी. त्याशिवाय योजनाबद्ध विकासाला कोणताच अर्थ नाही. किंबहुना आजच्या सगळ्या अराजकतेचे मूळ स्वतःहून लादून घ्यावयाच्या शिस्तीच्या अभावात आहे. त्याचे खापर संविधानावर फोडणे गैर आहे. डॉ. आंबेडकर यांनी म्हटल्याप्रमाणे, "गोष्टी चुकीच्या मार्गाने गेल्या तर त्याचे कारण आपले संविधान वाईट आहे हे नव्हे तर माणूस हा अधम आहे असेच आपल्याला म्हणावयास हवे."






## तक्ता क्र. ५

### केंद्र सरकारचा राजकोषीय वार्षिक सरासरी व्यवहार (कोटी रुपयांत)

| | १९७४–७९ | टक्के | १९७९–८२ | टक्के | १९८२–८५ | टक्के | १९८५–८८ | टक्के | नवव्या वित्तआयोगाचा अंदाज १९९०–९५ | टक्के |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **(१) महसूल खाते** | | | | | | | | | | |
| १. केवळ केंद्राचे कर व महसूल | ५,२०७ | ५९ | ८,७०९ | ६८ | १४,६४४ | ७० | २५,२४७ | ७४ | ५५,१४४ | ७३ |
| २. विभाजनीय करापासून विभागून उरलेला महसूल निव्वळ | ३,६७६ | ४१ | ४,१४४ | ३२ | ६,३४५ | ३० | ८,९६८ | २६ | २०,५८० | २७ |
| ३. एकूण | ८,८८३ | १०० | १२,८५३ | १०० | २०,९८९ | १०० | ३४,२१५ | १०० | ७५,७२४ | १०० |
| **वजा** | | | | | | | | | | |
| ४. संरक्षण, व्याज, धनसाहाय्य व इतर बिगरविकास महसुली खर्च | ५,२९९ | ५९ | ८,३२९ | ६५ | १३,६१४ | ६५ | २३,७४७ | ६९ | ६३,४४६ | ८४ |
| ५. विकासार्थ उपलब्ध महसूल | ३,५८४ | | ४,५२४ | | ७,३७५ | | १०,४६८ | | १२,२७८ | |
| ६. विकासार्थ राज्यांना अनुदान | १,०३६ | १२ | २,१४१ | १७ | ३,६०१ | १७ | ६,५०८ | १९ | १३,९६३ | १८ |
| ७. विकासार्थ महसुली खर्च | २,०११ | २३ | ३,५१४ | २७ | ६,१५७ | २९ | ११,५६० | ३४ | ४,४४२ | ६ |
| ८. महसुली खात्यावर शिल्लक/तूट | (+) ५३७ | (+) ६ | (–)१,१३१ | (–) ९ | (–)२,३८३ | (–) ११ | (–)७,६०० | (–)२२ | (–)६,१२७ | (–) ८ |

पुढील पानावर चालू










मागील पानावरून

| | १९७४–७९ | टक्के | १९७९–८२ | टक्के | १९८२–८५ | टक्के | १९८५–८८ | टक्के | नवव्या वित्तआयोगाचा अंदाज १९९०–९५ टक्के |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (२) भांडवल खाते | | | | | | | | | |
| १. भांडवल खात्यावरील वसूल | ४,४८९ | १०० | ७,३३० | १०० | १५,३७१ | १०० | १९,०८७ | १०० | उपलब्ध नाही. |
| २. संरक्षण व इतर बिगरविकास भांडवली विनियोग | ३६० | ८ | ५२७ | ७ | ६३५ | ४ | १,८५१ | १० | |
| ३. इतर भांडवली विनियोग | २,५७९ | ५७ | २,९२७ | ४० | ४,२४३ | २८ | ६,९०८ | ३६ | |
| ४. विकासार्थ विनियोग | १,७२२ | ३८ | २,९१७ | ४० | ५,२०४ | ३४ | ४,६५१ | २४ | |
| ५. राज्यांना कर्जे (निव्वळ) | १,०९४ | २५ | १,८११ | २५ | ५,१७८ | ३३ | ४,५४१ | २४ | |
| ६. एकूण भांडवली विनियोग | ५,७५५ | १२८ | ८,१८२ | ११२ | १५,२६० | ९९ | १७,९५१ | ९४ | |
| ७. भांडवल खात्यावरील तूट / शिल्लक | (–)१,२६६ | (–) २८ | (–) ८५२ | (–) १२ | (+) १११ | (+) १ | (+)१,१३६ | (+) ६ | |
| ८. महसुली व भांडवल खात्यावरील एकूण तूट शिल्लक | (–) ७२९ | | (–)१,९८३ | | (–)२,२७२ | | (–) ६,४६४ | | |
| (३) प्रमाणे | | | | | | | | | |
| १. सरासरी वार्षिक स्थूल राष्ट्रीय उत्पन्न (प्रचलित भावात) | ७८,९६८ | | १,२२,६९५ | | १,८३,२३६ | | २,६१,०५२ | | |
| २. केंद्रीय महसुलाचे व भांडवल वसुलीचे [१ (३) + २ (१)] १ शी प्रमाण (टक्के) | १७ | | १६ | | २० | | २० | | |
| ३. केंद्रीय तुटीचे २ (८) १ शी प्रमाण | ०·९ | | १·६ | | १·२ | | २·५ | | |









अनुक्रमणिका

## तक्ता क्र. ६

### राज्यांचा राजकोषीय वार्षिक व्यवहार (कोटी रुपयांत)

| | १९७७–७८ | १९८७–८८ | नवव्या वित्तआयोगाचा अंदाज १९९०–९५ |
|---|---|---|---|
| **१. महसूल खाते–** | | | |
| १. केवळ राज्यांचा कर महसूल | ४,३४९ | १९,३२२ | ३३,९३८ |
| २. करेतर महसूल | १,९३८ | ६,७४४ | ९,४९७ |
| एकूण– | ६,२८७ | २६,०६६ | ४३,४३५ |
| वजा | | | |
| ३. विकासेतर महसुली विनियोग | २,६८२ | १२,८४१ | ५४,९२७ |
| ४. पंचायत राज्य संस्थांना अनुदाने | १०३ | ४९१ | |
| ५. विकासार्थ उपलब्ध राज्यांचा महसूल | ३,५०२ | १२,७३४ | (–) ११,४९२ |
| ६. केंद्रीय करात वाटा | १,८०६ | ९,६६० | १७,५७६ |
| ७. केंद्राकडून अनुदान व अन्य हस्तांतरण | १,८३८ | ८,२७५ | ३,३२२ |
| एकूण– | ७,१४६ | ३०,६६९ | ९,४०६ |
| ८. विकासार्थ विनियोग | ६,१२७ | ३१,७५७ | ५,४३२ * |
| शिल्लक/तूट | (+) १,०१९ | (–) १,०८८ | (+) ३,९७४ |
| **२. भांडवल खाते–** | | | |
| १. अंतर्गत कर्ज (निव्वळ) | १७१ | १,८७५ | |
| २. केंद्राकडून कर्ज (निव्वळ) | १,१२१ | ५,८३२ | |
| ३. अन्य जमा | ७९५ | ४,४९० | |
| एकूण– | २,०८७ | १२,१९७ | उपलब्ध नाही. |
| ४. विकासार्थ भांडवली विनियोग | १,८१८ | ६,४२८ | |
| ५. विकासेतर विनियोग | ३६ | २२६ | |
| ६. विकासार्थ कर्जे | १,४०३ | ४,२६५ | |
| ७. विकासेतर कर्जे | ७९ | २५५ | |
| एकूण– | ३,३३६ | ११,१७४ | |
| भांडवल खात्यावर तूट/शिल्लक | (–) १,२४९ | (+) १,०२३ | |
| एकूण तूट (१ + २) | (–) २३० | (–) ६५ | |

टीप:– * आठव्या योजनेचा आराखडा अद्याप तयार झालेला नाही. हा नवव्या वित्तआयोगाचा किमान खर्चाचा अंदाज आहे. हा पूर्ण योजनेचा वार्षिक खर्च नव्हे.

अनुक्रमणिका

## तक्ता क्र. ७

### केंद्र–राज्ये हस्तांतरणाचे एकूण प्रमाण

| | १९५१–५५ | १९८५–८९ |
|---|---|---|
| १. वित्तआयोग– | | |
| अ) करात वाटा | २४·० | ३५·० |
| ब) कलम २७५ खाली अनुदान | १·९ | ३·६ |
| क) अन्य अनुदाने | ५·३ | ३·१ |
| | ३१·२ | ४१·७ |
| २. योजनाआयोग– | | |
| १. विकासार्थ अनुदान (कलम २८२) | | |
| अ) राज्य योजना | | १२·३ |
| ब) केंद्रीय योजना | | ३·२ |
| क) केंद्रपुरस्कृत योजना | | ८·५ |
| एकूण– | | २४·० |
| २. कर्जे– | | १७·७ |
| एकूण योजनाआयोग | ६१·५ | ४१·७ + |
| ३. अन्य कर्जे व अनुदाने | ७·३ | १६·६ |
| एकूण १ + २ + ३ | १००·० | १००·० |

+ यात १७ राज्यांची रिझर्व बँकेकडील ९० टक्के अधिकर्ष कर्जे मिटविण्यासाठी १९८५–८६ साली केंद्राने दिलेल्या १,६२८ कोटी रुपयांच्या कर्जांचा समावेश नाही.

अनुक्रमणिका

## तक्ता क्र. ८

### वित्तआयोगानुसार दरडोई दरसाल राज्यांची तूट / शिल्लक रुपये
### (१९७०–७१ च्या स्थिर किमतीत)

| राज्ये | सातवा हस्तांतरणा- | | आठवा हस्तांतरणा- | | नववा हस्तांतरणा- | |
|---|---|---|---|---|---|---|
| | पूर्वी | नंतर | पूर्वी | नंतर | पूर्वी | नंतर |
| **(अ) अधिक उत्पन्न असणारी** | | | | | | |
| १. पंजाब | +१२९ | +२६९ | +२५२ | +३८५ | – ३ | +४३ |
| २. हरियाणा | +१५९ | +२९३ | +२७५ | +३९७ | +५२ | +९६ |
| ३. महाराष्ट्र | +११५ | +२६६ | +२०२ | +३७५ | +४४ | +९२ |
| ४. गुजरात | + २७ | +१८४ | +१११ | +२६४ | + ८ | +५८ |
| सरासरी | + ९७ | +२४८ | +२०१ | +३४८ | +३० | +७७ |
| **(ब) मध्यम उत्पन्न असणारी** | | | | | | |
| ५. पश्चिम बंगाल | – ८८ | + ७५ | –२०४ | + १४ | –४३ | +२४ |
| ६. कर्नाटक | – | +१५१ | + ३५ | +२०४ | + ९ | +६३ |
| ७. केरळ | –११७ | + ५२ | – ९२ | + ९० | –५८ | + ८ |
| ८. राजस्तान | –१०८ | + ३६ | –१३३ | – २ | –७३ | +१४ |
| ९. तामिळनाडू | – ९८ | + ७५ | + ५९ | +२४४ | –१८ | +४५ |
| सरासरी | – ८१ | + ८० | – ६९ | +११० | –३४ | +३३ |
| **(क) मागास** | | | | | | |
| १०. आंध्र प्रदेश | – ६० | + ९८ | – ५८ | +१३१ | –२१ | +४४ |
| ११. मध्य प्रदेश | – ४५ | +१२५ | – ५७ | +१४० | –५१ | +२२ |
| १२. ओरिसा | –२०१ | + ७ | –२३२ | – १४ | –९२ | +११ |
| १३. उत्तर प्रदेश | – ६४ | +१०३ | – ७० | +१२६ | –६४ | +१३ |
| १४. बिहार | – ८४ | + ९२ | –१६६ | + ४४ | –५१ | +२८ |
| सरासरी | – ७६ | + ९५ | –१०१ | + ९९ | –५४ | +२३ |
| **(ड) विशेष वर्गात मोडणारी राज्ये** | | | | | | |
| १५. गोवा | – | – | – | – | –२५१ | – |
| १६. जम्मू-काश्मीर | – ३३४ | + १७ | – ६१२ | –१५८ | –२७६ | + १ |
| १७. आसाम | – ११५ | + ३१ | – २६७ | – ३६ | – ८८ | + ८ |
| १८. अरुणाचल प्रदेश | – | – | – | – | –६४६ | – |
| १९. सिक्किम | – ६३९ | + १२ | –१,०७८ | –३३९ | –३६६ | – |
| २०. नागालँड | –१,७०१ | + ३१ | –२,२९७ | –७५२ | –७६३ | – |
| २१. मणिपूर | – ७२३ | + ३९ | –१,०९४ | –३१६ | –३७८ | – |
| २२. हिमाचल प्रदेश | – ४१३ | + १० | – ६१३ | –१५७ | –२११ | – |
| २३. मेघालय | – ५३७ | + २० | – ९४० | –२७० | –३०१ | – |
| २४. मिझोराम | – | – | – | – | –९८३ | – |
| २५. त्रिपुरा | – ५३५ | + १० | – ९०० | –२५९ | –३४४ | – |
| सरासरी | – २८९ | + २३ | – ५०९ | –११८ | –२०६ | + ४ |
| सर्व राज्ये | – ५६ | +११५ | – ५६ | +१३८ | – ४१ | +३० |

अनुक्रमणिका

**तक्ता क्र. ८ – संदर्भ :**

१. सातव्या व आठव्या दरडोई उत्पन्नाचा आधार इकॉनॉमिक अ‍ॅण्ड पोलिटिकल वीकली, जुलै २५, १९८७, पृ. १२४५.

२. घाऊक किमतींचे सरासरी निर्देशांक–

१९७०–७१ = १००; १९७४–७९ = १७९·२

१९७९–८४ = २७१·९; १९८६–८७ = ३७६·८

३. नवव्या वित्तआयोगाचा दुसरा अहवाल पृ. २९–३१.

**तळटीपा :**

१. इकॉनॉमिक अँड पोलिटिकल वीकली; २५ जुलै १९८७; पृ. १२४८; इथला बी. पी. आर. विठ्ठल व एम. एल. शास्त्री यांचा लेख.

२. सरकारिया समितीचा केंद्र-राज्य संबंधावरचा अहवाल; भाग पहिला; १९८८; पृ. २८७–२८८.

३. उपरोक्त २; पृ. २८३–८४; येथून उद्धृत.

४. नवव्या वित्तआयोगाचा दुसरा अहवाल; डिसेंबर १९८९; पृ. २८.

५. आय. एस. गुलारी (रू), सेंटर-स्टेट बजेटरी ट्रान्स्फर्स, ऑक्सफोर्ड यु. प्रेस, मुंबई; १९८७ यातील एस. गुहाव यांचा लेख; पृ. २९३.

६. रिझर्व बँक ऑफ इंडिया; रिपोर्ट ऑन करन्सी अँड फायनान्स १९८८-८९; खंड II; पृ. १३३ व १५१.

७. उपरोक्त ४; पृ. १७ व ८४.

८. १९८१ साली आसाममध्ये लोकसंख्यागणना झाली नाही हे १९७१ ची जनगणना घेण्याचे कारण असावे.

* *










# आठव्या पंचवार्षिक योजनेतील विवादास्पद आरोग्यसंवर्धनविषयक धोरण*

लेखक : रीता प्रिया (अनु. अ. ना. ठाकूर)

१९८९ साली राष्ट्रीय आघाडीचे सरकार सत्तेवर आले. आणि नंतर नियोजन आयोगाने आठव्या पंच-वार्षिक योजनेचा आराखडा बनविण्याचे काम हाती घेतले. योजनेची दिशा सूचित करणारा एक प्रबंध तयार करण्यात आला. या मसुद्याचा रोख मुळात विकेंद्रीकरण व रोजगारनिर्मिती यांवर भर देणे हा आहे. यामुळे येथील जनतेच्या आरोग्याचा दर्जा सुधार-ण्यास मोठा हातभार लागू शकेल. इतर क्षेत्रांमधील विकासकार्याचा आरोग्यविषयक सेवांवर कसा प्रभाव पडू शकेल, याविषयी या मसुद्यात अधिक खोलवर विचार करण्यात आल्याचे दिसत नाही. यात एकात्मि-कृत (किंवा एकगठ्ठा) सामाजिक सेवांमधील एक घटक म्हणून आरोग्यसंवर्धनाकडे पाहण्यात आले आहे. त्यामुळे आरोग्यसेवेकडे दुर्लक्ष होण्याचा धोका नेहमीच राहील, असे तज्ज्ञांना वाटते आहे.

ग्रामीण भागात आरोग्यसेवा पोचविण्याच्या पद्धती अपुऱ्या व सदोष आहेत, असे या मसुद्यात प्रारंभीच म्हटले आहे आणि यात सुधारणा करून दोष घाल-विण्यासाठी पुढील पाच प्रकारचे उपाय वा कृतिकार्य-क्रमात सुचविण्यात आले आहेत.

१) " शिक्षण तसेच महिलांविषयीचे विकास कार्य-क्रम यांसारख्या अन्य सामाजिक सेवांचाही अंतर्भाव असलेल्या एकात्मिकृत कार्यक्रमांचे एक अभिन्न अंग म्हणून " आरोग्यसेवेकडे पाहणे.

२) कुष्ठरोग, हिवताप व काळा आजार या रोगांच्या नियंत्रणासारख्या राष्ट्रीय कार्यक्रमांना खास उत्तेजन वा मदत देणे.

३) सविस्तर नियोजन करताना विकेंद्रीकरण करणे आणि राज्य तसेच स्थानिक पातळीवर विकास कार्यक्रमांची अंमलबजावणी करणे व तसे करताना मनुष्यबळ प्रशिक्षण, संशोधन व आरोग्यविषयक माहि-तीचे संकलन यांसारख्या बाबी केंद्र शासनाच्या अख-त्यारीत ठेवणे.

४) वैद्यकीय शिक्षण पद्धतीत " (मुळापासून) विधायक फेरफार निश्चितपणे करणे." आणि

५) परंपरागत वैद्यकीय पद्धतींमधून आलेल्या साध्या, स्वस्त पद्धती व रोगोपचार यांचा वापर करून आरोग्यसंवर्धनाची पद्धती समृद्ध करण्याची गरज लक्षात घेणे.

पहिल्या मुद्द्यातून सूचित होणारा कार्यक्रमाचा एकूण रोख व दुसऱ्या मुद्द्यातून त्याचा करण्यात आलेला पाठपुरावा पाहता ही दिशा अतिशय वादग्रस्त वा संशयास्पद वाटते. याचा परामर्श लेखाच्या पहिल्या भागात घेतला आहे. लेखाच्या उर्वरित भागात काही ठोस उपायांचा आढावा घेतला आहे. या उपाययोजने-मुळे आरोग्यसंवर्धनाच्या पद्धतीत व ती राबविणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या मनोवृत्तीत फेरफार होण्यास सुरुवात होईल, अशी अपेक्षा आहे.

वेगवेगळ्या सुट्या प्रश्नांसाठी ‘ खास प्रकारचे कार्यक्रम योजणे व मग त्यांचे एकीकरण करून समन्वित कार्यक्रमांचे संच तयार करणे’, अशा रीतीने गेल्या चाळीस वर्षांत आरोग्यसेवांचा विकास होत आलेला आहे. रोगप्रतिबंधात्मक, साहाय्यक (प्रोत्साहनपर) व रोगनिवारक सेवांचा समन्वय करण्याची संकल्पना

---

* ‘इकॉनॉमिक अँड पॉलिटिकल वीकली’च्या १८ ऑगस्ट १९९० च्या अंकात प्रसिद्ध झालेल्या रीता प्रिया यांच्या ‘डुबियस पॅकेज डील-हेल्थ केअर इन एट्थ प्लॅन’ या लेखाचा अनुवाद सदर साप्ताहिकाच्या सौजन्याने दिला आहे.

अनुक्रमणिका

अशा रीतीने प्रत्यक्षात आणणे, हे आरोग्यसंवर्धनाच्या पद्धती अपेशी ठरण्यामागील एक प्रमुख कारण आहे. इतर सामाजिक सेवांबरोबर आरोग्यसेवेची सांगड घालणे हा याच तर्कशास्त्राचा केवळ पुढील टप्पा आहे. या समन्वित वा एकात्मिकृत सेवांच्या दिशेने आरोग्य-सेवा पुढे चालू ठेवल्यास आरोग्यसंवर्धनाच्या पद्धतीमध्ये सुधारणा होण्याची शक्यता अगदी थोडीच आहे.

निकोप आरोग्यसंवर्धनासाठी रोगप्रतिबंधक व आरोग्यसंरक्षक सेवांचा समन्वय साधण्याची कल्पना अमलात आणणे गरजेचे आहे. मात्र अशा एकात्मि-करणाची कल्पना उथळपणे वापरली जात असल्याचे दिसते. रोगप्रतिबंधक विरुद्ध रोगोपचारविषयक उपाय हा प्रश्न उपस्थित करणे येथे अभिप्रेत नाही. तसेच या दोन उपायांचे कार्य स्वतंत्रपणे व्हावे असेही यातून सुचवायचे नाही. एका बाजूला रोगाला प्रतिबंध करण्यासाठी करावयाच्या उपायांच्या नावाखाली रोग-निवारक उपायांकडे दुर्लक्ष करण्यात येते वा ते दूर सारले जातात; तर दुसऱ्या बाजूस खास प्रकारच्या रोगप्रतिबंधक उपायांच्या नावाखाली आरोग्याच्या दर्जासाठी आवश्यक असणाऱ्या तरतुदींकडे दुर्लक्ष होते, हा खरा प्रश्न आहे. खरे तर, या दोन्ही उपाययोजनांना उचित स्थान द्यायला हवे. याचा अर्थ १) आरोग्य-संवर्धनाच्या पद्धतीत रोगप्रतिबंधक उपायांची दखल घ्यायला हवी आणि २) राष्ट्रीय विकासाविषयीच्या कामांमध्ये निरोगीपणाला प्रोत्साहन देण्याचे आणि अनारोग्य टाळले जाण्याचे उपाय आले पाहिजेत. पुढे हा मुद्दा थोडा अधिक स्पष्ट केला आहे.

याकरिता उत्तर भारतातील विविध प्रदेशांतील व दिल्लीतील (शहरी) गरीब लोकांची पाहणी करून संशोधन करण्यात आले आहे. यातून अशा प्रकारची आरोग्यसंवर्धक पद्धतीविषयीची जाण आली आहे. या युक्तिवादाला पुढील दोन मुद्द्यांचा आधार घेण्यात आलेला आहे : (अ) गेल्या चाळीस वर्षांपासून नियोजनसेवांचा अंतर्भाव आरोग्यसेवांमध्ये आल्यानंतर त्यांची आजची स्थिती ही अशी एकात्मिकृत झालेली आहे आणि (आ) येथील बहुसंख्य नागरिकांच्या मनात आरोग्य व आरोग्यसंवर्धन यांविषयी एक विशिष्ट अपेक्षा निर्माण झालेली आहे.

ग्रामीण पातळीवरील आरोग्यसंवर्धन सेवांमध्ये पुरेसे कर्मचारी नाहीत. त्यामुळे त्यांना अधिक लोकांकडे लक्ष द्यावे लागतेच. शिवाय त्यांच्यावर असंख्य कामांचे दडपण असते. या कामांमध्येही अधिक भर रोगप्रतिबंधक कामांवर देण्यात येतो. परिणामी एक क्षुल्लक वा गौण काम म्हणून ते वैद्यकीय उपचार 'सुद्धा' करतात. आरोग्यसेवांच्या तळाशी असणाऱ्या या व्यवस्थेचा अर्थ काय होतो ?

बरे नसताना डॉक्टरने आपली काळजी घ्यावी, अशी लोकांची अपेक्षा असते. मग ते काय करतात ? बहुधा ते जवळपास असलेल्या आपल्या भागातील 'खासगी डॉक्टर'कडे जातात. तो अर्हताप्राप्त नाही याची त्यांना 'कल्पना' असते. पण निदान कोणते तरी इंजेक्शन व थोड्याफार गोळ्या तो देईल हे त्यांना माहीत असते. त्यामुळे दुखण्याला उतार पडेल असेही त्यांना वाटते. त्यांच्यासमोर याविना दुसरा पर्याय नसतो. पूर्वीपासून चालत आलेल्या परंपरागत उप-चारांमुळे (लोकोपचारांमुळे) त्यांना वरचेवर उद्भव-णाऱ्या आजारांशी मुकाबला करता येत असे. मात्र असे बहुतेक उपचार अवैध ठरविण्यात आले आहेत; तसेच ते वापरात नाहीत आणि काही तर विस्मृतीच्या गर्तेतही फेकले गेले आहेत. असे 'डॉक्टर' व त्यांच्या-कडून मिळणारे औषध यांचे स्तोम माजून त्यांना एक प्रकारचे तेजोवलय प्राप्त झाले आहे. आणि लोकां-समोर असलेला हा बहुधा एकमात्र असा पहिलावहिला उपाय उरला आहे.

खरे तर सार्वजनिक आरोग्यसंवर्धनविषयक कल्पने-मुळे अशी अपेक्षा लोकांना वाटू लागली. मात्र या सेवेने ती पूर्ण केलेली आढळत नाही. सार्वजनिक आरोग्य-सेवांमार्फत रोगप्रतिबंधक, प्रोत्साहनपर आणि रोग-निवारणविषयक सेवा एकत्रितपणे पुरविल्या जातात, असे गृहीत धरूनच चालतात. प्रत्यक्षात तसे आहे का ? ग्रामीण प्राथमिक आरोग्यसंवर्धनसेवा पूर्णपणे कुटुंब-नियोजनविषयक कार्यक्रमाला जुंपण्यात आलेली आहे. या सेवेतील सर्व कर्मचारी कुटुंबनियोजनाचे नेमून दिलेले लक्ष्य गाठण्याच्या कामात गुंतलेले आहेत. विशेषकरून ज्यांचा ग्रामीण जनतेशी प्रत्यक्ष संबंध येतो, असे कर्म-चारीच यात गुंतून राहतात. उदाहरणार्थ, ग्रामीण आरोग्यसेवक, अनेक प्रकारची कामे करण्यासाठी नेमण्यात आलेले (हरकामे) पुरुष कर्मचारी आणि आरोग्य मदतनीस–सुईण अशी परिचारिका. 'बालकांचे जीवनरक्षण' या नावाखाली रोगप्रतिबंधक लशी टोच-



अनुक्रमणिका

ण्याची लक्ष्ये निश्चित करण्यात आली आणि तीही कुटुंबकल्याण कार्यक्रमाचा एक भाग बनली. परिणामी तीही महत्त्वाची बनली. तिसरी गोष्ट म्हणजे हिवतापाच्या रोग्यांची पाहणी व त्यांवरील उपचारविषयक कामही काही प्रमाणात चालू आहे. याशिवाय नाव घेण्याजोगे अन्य कोणतेही काम ग्रामीण आरोग्यसेवेमार्फत चालू नाही.

ही कामेच तेवढी व्यवस्थित चालली आहेत की नाही हे तपासणी अधिकारी ताडून पाहतात. मधल्या फळीतील किंवा प्राथमिक आरोग्य-संवर्धक डॉक्टर अथवा जिल्हा वैद्यकीय अधिकारी हे काम करतात. आणि सामान्यपणे त्यासाठीच ते या केंद्रांना भेटी देतात किंवा मासिक बैठकांच्या वेळी हे काम करण्यात-उरकण्यात– येते. क्षय झालेले किती रोगी आढळले, त्यांपैकी किती जणांवर उपचार करण्यात येत आहेत किंवा क्षय-प्रतिबंधक औषधांचा पुरेशा प्रमाणात पुरवठा होतो आहे की नाही यांविषयी कोणालाच फिकीर नसते. किरकोळ आजारांवर उपचार करण्याचे कामही स्थानिक कर्मचाऱ्यांकडे अधिकृतपणे सोपविलेले असते. मात्र याविषयीची काळजी कधीतरी कोणी केली आहे, असे दिसत नाही. या कर्मचाऱ्यांच्या याविषयीच्या ज्ञानाची पातळी, औषधोपचारांची त्यांची रीत वगैरे गोष्टी कोणीच तपासून पाहत नाही.

दुसऱ्या बाजूला ग्रामीण भागातील वरील तीन प्रकारच्या कर्मचाऱ्यांपैकी बहुसंख्य कर्मचारी स्वतःला ' डॉक्टर साहेब ' समजून सर्व तऱ्हेची आरोग्यसेवा देत असतात. कुटुंबनियोजनाची व रोगप्रतिबंधक उपायांची कामे ते अधिकृत कामे म्हणून करीत असतातच शिवाय खासगी सेवेच्या रूपात ते रोगांवरील उपचारही करतात. अधिकृतपणे त्यांचे केवळ आरोग्यसंवर्धनाविषयीचे जुजबी प्रशिक्षण झालेले असते. मात्र ते तोडकीमोडकी वैद्यकीय माहिती मिळवितात व वैद्यकीय उपचार करण्याचा उद्योग सुरू करतात.

अशा प्रकारे सरकारी कर्मचारी पुरेशा प्रशिक्षणाविना व अनधिकृतपणे आरोग्यसंवर्धनविषयक काही गरजा भागवीत असतात. उरलेल्या काही गरजा अनौपचारिक प्रशिक्षण घेतलेल्या व्यक्तींकडून आणि अन्य वैद्यकीय पद्धतींचे प्रशिक्षण घेतलेल्या व्यक्तींमार्फत भागविल्या जातात. या तिन्ही प्रकारच्या लोकांना ' लब्धप्रतिष्ठित डॉक्टर ' किंवा ' वैदू ' असे संबोधिण्यात येते.

वैद्यकीय उपचारांसाठी एकूण लोकसंख्येपैकी अगदी थोडेच लोक प्राथमिक आरोग्य केंद्रांमध्ये वा उपकेंद्रांत जातात. या शासकीय आरोग्यसेवा या जनतेची ' काळजी ' घेणाऱ्या संस्था आहेत, असे सर्वसाधारणपणे मानले जात नाही. उलट, या संस्थांविषयी एक प्रकारची अढी लोकांच्या मनात असते. म्हणजे कुटुंबनियोजन वगैरे गोष्टी लोकांवर लादण्यासाठी या संस्था आहेत, असे लोकांना वाटते; आपल्या आरोग्यविषयक गरजा पूर्ण करणाऱ्या या संस्था आहेत असे काही जनतेला वाटत नाही.

वरील ' वैदू ' च्या औषधयोजना करण्याच्या उद्योगामुळे बहुधा शहरातील गरीब व ग्रामीण लोकांच्या शरीरांमध्ये अज्ञात व अनाकलनीय असा गडबडघोटाळा होत असण्याची शक्यता आहे. उदाहरणार्थ, यांच्याकडून विनाकारणच स्टेरॉइडांचा जादा मारा रुग्णावर होतो, ही सर्वपरिचित चिंताजनक बाब आहे. अर्थात खुद्द प्रशिक्षित अशा ' डॉक्टरां ' च्या गैरव्यवहारातूनच औषधाचा असा दुरुपयोग करायला ते शिकतात. तथापि वंचित वा तळागाळातील लोकांवर उपचार करण्यात अशा अर्धवट प्रशिक्षित मंडळींचा अधिक भरणा असतो. त्यामुळे त्यांच्या वैद्यकीय व्यवहाराचा उपद्रव सरळ सरळ या समाजघटकावर अधिक प्रमाणात होतो.

रोगोपचारांच्या बाबतीतील परिस्थिती अशी आहे. रोगप्रतिबंधक व प्रोत्साहनपर आरोग्यसेवांचा प्रत्यक्ष संबंध येतो तो आहार व पोषण, पिण्याचे पाणी, स्वच्छता इत्यादी गोष्टींशी. शिवाय स्त्रीशिक्षण, स्त्रियांचा सामाजिक दर्जा, रोजगार या गोष्टींचाही आरोग्याचा दर्जा निश्चित होण्यास हातभार लागत असतो. अर्थात, हे प्रत्यक्ष आरोग्यविषयक म्हणता येतील असे घटक नाहीत. पण ते आरोग्यसेवांमध्ये अंतर्भूत असतात. अशा तऱ्हेने एकात्मिक सेवांच्या खिचडीत अनेक गोष्टी येतात आणि या सर्वांचे मिळून ' आरोग्यविषयक कार्यक्रम ' ( किंवा ' सामाजिक सेवा ')तयार केले जातात. थोडक्यात रोजगार, पाणीपुरवठा, आरोग्यसंवर्धन, स्वच्छता या सर्व ' सामाजिक सेवा ' ठरल्या.

अगदी अलीकडच्या काळापर्यंत आरोग्यसेवा म्हणजे कुटुंबनियोजन, रोगप्रतिबंधक लस टोचणे व

हिवतापाच्या निर्मूलनाचा कार्यक्रम असे समीकरण होऊन बसले होते. अगदी अलीकडे या सेवांचा कल मात्र वेगळा झालेला दिसतो. आणि त्यानुसार जनतेच्या आरोग्यावर परिणाम करणाऱ्या सर्व गोष्टींचा अंतर्भाव आरोग्यविषयक कार्यक्रमांमध्ये करण्यात आला आहे. यामागील प्रेरणा जागतिक आरोग्य संघटना, युनिसेफ, स्वयंसेवी संघटना वगैरेंची आहे.

मुख्यत्वे अधिक गरीब लोकांसाठी असलेल्या आरोग्यसेवांमार्फत आता केवळ त्यांचे आरोग्यसंवर्धन, रोगनिदान व उपचार एवढीच कामे करण्यात येत नाहीत; तर सदर अन्य 'सामाजिक सेवा' पुरविण्यासाठीही या आरोग्यसेवा कटिबद्ध झालेल्या आहेत. आठव्या पंचवार्षिक योजनेच्या मार्गदर्शक मसुद्यात एकात्मिकृत आरोग्यसंवर्धन पद्धतीत 'सामाजिक सेवा' हा एक अविभाज्य घटक मानलेला असल्याने त्यातवरील विचारसरणीचे प्रतिबिंब उमटणे साहजिकच आहे.

सदर बाबी आरोग्याच्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत हे खरेच; पण त्यांना आरोग्यसेवांचा पेहराव चढविणे किंवा सामाजिक सेवांच्या गाठोड्यात त्यांना समाविष्ट करणे हा काही गरजा भागविण्याचा प्रभावी मार्ग नाही. उलट, या गरजा भागविल्या गेल्याचा आभास निर्माण करणारा उपाय ठरू शकेल. अशा तऱ्हेने या रीतीने दीर्घकाळ उपाय टाळले गेले आणि अस्थायी उपाययोजना करण्याची धडपड होत आलेली दिसते.

उदाहरण म्हणून पिण्याच्या पाण्याचा पुरवठा घेऊ या. असा पाणीपुरवठा हा एकात्मिकृत आरोग्य-कार्यक्रमाचा एक भाग म्हणून मानतात व त्यासाठी हातपंप बसविण्यात येतात. असे हातपंप बसविले म्हणजे शुद्ध, सुरक्षित पाणी जनतेला जणू पुरविण्यात आलेच आहे, असे गृहीत धरले जाते. हा उपाय म्हणजे पाणीपुरवठ्याचा प्रश्न अगदी सोपा, साधा आहे, असे समजण्यासारखे आहे. खरे तर, एकूण पाण्याच्या व्यवस्थापनातील हा एक प्रश्न आहे असे मानून तो हाताळला पाहिजे. उदाहरणार्थ, दिल्लीमधील सर्व लोकांना पुरेसे व शुद्ध पाणी कसे पुरवावे हा खरा प्रश्न आहे. एका किंवा ५० झोपडपट्ट्यांतून हातपंप बसविणे हा काही खरा उपाय नाही. कारण अशा उपायाने उरलेल्या ६०० गलिच्छ वस्त्यांमधून नियमितपणे हमखास पाणीपुरवठा होईल अशी कोणतीच तरतूद होत नाही. शिवाय जेथे हातपंप बसविण्यात आले आहेत, तेथील सर्व लोकांची पाण्याची गरज भागविण्यास पुरेसे हातपंप तेथे नसतात, हेही खरेच आहे. म्हणून दिल्लीतील पाणीपुरवठ्याचा प्रश्न हाताळताना विभागानुसार पाण्याचा सोईस्कर स्रोत व पाणीवाटपाची योग्य पद्धती शोधणे आवश्यक आहे. पाणीपुरवठा करताना केवळ झोपडपट्टीतील लोकांचा वेगळा विचार न करता सर्व स्तरांवरील लोकांचा एकत्रित विचार करायला हवा. आरोग्यसेवा किंवा मूलभूत नागरी सेवांचा कार्यक्रम म्हणून याचा विचार करून चालण्यासारखा नाही (मूलभूत नागरी सेवांचा एकात्मिक कार्यक्रम युनिसेफने पुरस्कृत केला आहे व दिल्ली प्रशासन तो अमलात आणते; शिवाय हा कार्यक्रम इतर नागरी व शहरी प्रशासनांनीही स्वीकारलेला आहे). आणि हातपंप बसविण्यात आल्याने एक मोठा तोटाही झाला. तो म्हणजे महापालिका किंवा दिल्ली विकास प्राधिकरण यांच्यावरचा आपण एकूण पाणीव्यवस्थापनासाठी काहीतरी केले पाहिजे हा दबाव कमी झाला. परिणामी शुद्ध पाण्याअभावी अतिसार, पटकी व बालपक्षाघात (पोलिओ) यांसारखे आजार बळावले. त्यामुळे या रोगांचा प्रतिबंध करण्यासाठी आरोग्यसेवांना प्रतिबंधात्मक उपाय (उदाहरणार्थ, लस टोचणे) 'योजावेच' लागले. यातून एकात्मिक कार्यक्रमांची खिचडी तयार होते. परिणामी दीर्घकाळासाठी उपयुक्त ठरू शकतील असे टिकाऊ उपाय योजण्याचे प्रयत्न बाजूला पडतात. थोडक्यात यांपैकी एक उपाय हा दुसऱ्याला पर्याय ठरू शकत नाही.

आरोग्यसेवांव्यतिरिक्त अन्य क्षेत्रांच्या नियोजनामध्ये आरोग्याला महत्त्वपूर्ण स्थान देण्याची गरज आहे. रोजगारनिर्मितीविषयीच्या धोरणापासून ते शेतीविषयक धोरणापर्यंत, जमीन व पाणी यांचे व्यवस्थापन, तसेच पशुसंवर्धन ते अन्नप्रक्रिया उद्योगांना प्रोत्साहन देण्यापर्यंत आणि वसाहतींच्या उभारणीपासून ते घरबांधणी कार्यक्रमांपर्यंत अशा सर्व तऱ्हेच्या विकासविषयक कामांचे नियोजन करताना त्यांचा लोकांच्या आरोग्यावर होणारा परिणाम विचारात घेतला पाहिजे. आतापर्यंत आपले औषधविषयक धोरणसुद्धा औद्योगिक प्रेरणांनुसार वा गरजांनुसार

ठरत असे; म्हणजे येथील लोकांच्या आरोग्यविषयक गरजांनुरूप ठरत नव्हते. या घटकावर ज्या क्षेत्रांचा सर्वाधिक प्रत्यक्ष प्रभाव पडू शकतो त्या क्षेत्रांसाठीची धोरणे ठरवितानाही आरोग्याचा अजिबात विचार करण्यात आलेला दिसत नाही. उदाहरणार्थ, कृषि-विषयक धोरण आखतानाही शेती, अन्न व पोषण यांच्यातील परस्परसंबंधांचा विचार करण्यात आलेला दिसत नाही (अगदी या मार्गदर्शक प्रबंधातही याची दखल घेतलेली दिसत नाही).

गेल्या काही दशकांमध्ये भात व गहू यांच्या जादा उत्पन्न देणाऱ्या जातींची लागवड करण्यासाठी धडक कार्यक्रम राबविण्याचे करण्यात आलेले प्रयत्न हे असेच उदाहरण म्हणता येईल. यामुळे भरडधान्ये, कडधान्ये व गळिताची पिके यांचे उत्पादन पार घटून गेले. सुमारे २० ते ३० वर्षांपूर्वी किमान उत्तर व मध्य भारतातील लोकांच्या मूळ आहारात मुख्यत्वे भरड धान्ये, कडधान्ये तसेच दूध-दुभत्याचे पदार्थ यांचा अंतर्भाव असे. आता या भागातील लोकांचा आहार म्हणजे चपाती, तिखट-मीठ व थोडीफार भाजी असा निकृष्ट प्रतीचा झाला आहे. छोट्या प्रमाणावरील पशुपालनाचा व्यवसाय उतरणीला लागला आहे. आणि उपलब्ध होणारे अल्पस्वल्प दूध शहरातून विकण्यात येते. परिणामी ग्रामीण भागांतील पुष्कळ लोकांच्या आहारात दूधदुभत्याचे पदार्थ नावापुरतेच उरले आहेत. अशा तऱ्हेने पोषणमूल्यांचा विचार केल्यास या लोकांच्या आहाराचा दर्जा निश्चितपणेच खालावला आहे. परिणामी या संकटावर मात करण्यासाठी ' स्वस्त, सकस, पूरक खाद्यपदार्थ ' बनविण्याचा उद्योग हाती घ्यावा लागतो. तसेच खास कार्यक्रम आखावे लागतात.

रोगप्रतिबंधक, आरोग्य-पुष्टीकारक व रोगोप-चारांविषयीच्या एकात्मिक सेवांच्या खिचडीमुळे प्रत्यक्षात आपण काय साध्य केले ? याचे दोन दुष्परिणाम झाले आहेत. एक तर मूलभूत गरजा भागविण्यासाठी दीर्घकालीन, टिकाऊ उपाययोजना करणे शक्य होत नाही. त्यामुळे या गरजांची परिपूर्ती लांबणीवर पडते. म्हणजे यामुळे आर्थिक अपव्यय तर होतोच, शिवाय मानवी बळाचा विचार केला तरी ही एक प्रकारची नासाडी वा उधळपट्टी ठरते. दुसरी गोष्ट म्हणजे या एकात्मिक सेवा अपेक्षित समाजापर्यंत कशा पोचविता येतील, यावरच या सेवांतील लोकांची कल्पनाशक्ती व निर्मितिक्षमता एकवटलेली आहे. वैद्यकीय माहितीचा योग्य रीतीने वापर करणे किंवा आपल्या गरजा व परिस्थिती यांना अनुरूप ठरेल अशा रीतीने रुग्णांच्या सामान्य प्रश्नांची वैद्यकीय दृष्टीने दखल घेणे या गोष्टींच्या बाबतीत कल्पकतेला व निर्मितिक्षमतेला स्थान उरलेले नाही. आरोग्यसंवर्धनातील अशा उणिवांची तीव्र झळ ग्रामीण व शहरी तसेच गरीब व श्रीमंत अशा सर्व तऱ्हेच्या लोकांना पोचत आहे.

खुद्द आरोग्यसेवांमध्ये करावयाच्या सुधारणांविषयीच्या प्रश्नांकडे आता वळू या. रोगांवरील उपचारांद्वारे आरोग्यसंवर्धन करणे ही महत्त्वाची बाब आहे व त्याविषयीच्या गरजा भागविण्यासाठी आरोग्य-सेवांना गती देण्याच्या कामाला अग्रक्रम देणे आवश्यक आहे. याद्वारे रुग्णांची चांगल्या रीतीने देखभाल तर होईलच, शिवाय रोगप्रतिबंधक उपायांचे महत्त्व लोकांना पटण्यासही याची मदत होईल. सध्याच्या वैद्यकीय सेवांच्या चौकटीला धक्का न लावता व सध्याच्या कर्मचाऱ्यांकडूनच हे काम करून घेता येणे शक्य आहे. यासाठी पुढील सूचना उपयुक्त ठरू शकतील : कुटुंब-नियोजनावर सध्या जो फाजील भर देण्यात येतो त्याऐवजी गरजेनुसार गर्भधारणेला प्रतिबंधक असे चांगले, सुरक्षित व प्रभावी उपाय योजायला हवेत. विशेषकरून स्त्रियांमध्ये, अगदी ग्रामीण व शहरी गरीब स्त्रियांमध्येही असा उपाय योजण्याची आवश्यकता आहे. तथापि सरकारी कर्मचारी कुटुंबनियोजनविषयक कार्यक्रम आक्रमकपणे रेटून नेतात आणि शासकीय यंत्रणांमार्फत राबविण्यात येणाऱ्या गर्भधारणाप्रतिबंधक विविध पद्धतींचा अनुभवही तेवढासा ठीक नाही. यामुळे लोक शासनाच्या कुटुंबनियोजनविषयक सेवांच्या बाबतीत उदासीन झाले आहेत. सदर पथदर्शी प्रबंधात आरोग्यसेवेशी निगडित नसलेल्या स्त्रियांची आर्थिक पातळी, सामाजिक दर्जा वगैरे उंचावण्यासारख्या बाबीं-वरही भर दिलेला आढळतो. याचबरोबर गर्भप्रतिबंधक सेवा अधिक चांगल्या रीतीने व शक्य तेवढ्या सुरक्षित पद्धतीने राबविल्या पाहिजेत. याचा अर्थ एका शिबि-रात ३०० ते १,००० स्त्रियांवर कुटुंबनियोजनविषयक शस्त्रक्रिया करण्यात आल्या अथवा झटपट व सहज काळजी न घेता तांबी बसविण्यात आल्या यांसारख्या गोष्टी टाळायला हव्यात. यामुळे यातून उद्भवणाऱ्या तक्रारी कमी होतील व या उपायांविषयी संशय वा

अनुक्रमणिका

गैरसमज निर्माण होणार नाहीत. याच्याच जोडीने मुलांच्या आजारांवर उपचार केले गेले आणि त्यांच्या स्वास्थ्याची काळजी घेतली गेली, तर लोकसंख्या-वाढीला आळा घालण्याच्या कार्यक्रमाला दीर्घकाळपर्यंत प्रोत्साहन मिळत राहण्याची शक्यता आहे. यासाठी कुटुंबनियोजनासाठी अयोग्य रीतीने धडपड करण्याची व त्यावर अवास्तव भर देण्याची गरज उरणार नाही. यामुळे हे कर्मचारी आरोग्यसंवर्धनाचे मूलभूत कार्यक्रम राबविण्यावर आपले लक्ष एकवटू शकतील. म्हणजे विविध आजारांवर उपचार करणे, प्रतिबंधक लशी टोचणे, गर्भप्रतिबंधक योजनांचा पाठपुरावा करणे यांसारखी कामे करू शकतील.

ग्रामीण आरोग्यसेवकांविषयीच्या धोरणात सुधारणा होणे गरजेचे आहे. यामुळे हे कर्मचारी रुग्णालयीन काम अधिक कुशलतेने करू शकतील. व रोगप्रतिबंधक उपायांनी लोकांचे आरोग्य कसे सुधारू शकते याविषयी त्यांना अधिक चांगली माहिती असू शकेल. दुसरी गोष्ट म्हणजे, शासकीय कार्यक्रम राबविण्यासाठी कर्मचाऱ्यांची दर्जानुसार एक उतरंड असते व तिच्यात हे कर्मचारी तळाशी असतात. ते तसे न राहता आरोग्यसेवेतील जनतेचे प्रतिनिधी म्हणून त्यांनी काम करावे अशी अपेक्षा आहे. या प्रबंधाचा भार पंचायती राज्यातील विकेंद्रीकरणावर व त्याला प्रोत्साहन देण्यावर आहे. आरोग्यसेवा हे असे क्षेत्र असून त्यात या सेवकांना एक प्रकारची स्वायत्तता अपेक्षित आहे व ते जनतेला जबाबदार असले पाहिजेत; शासकीय सेवांना नव्हे ! तिसरी गोष्ट म्हणजे, यांचे काम हे काही प्रमाणात विश्वासार्ह असले पाहिजे. आरोग्यविषयक बाबींमध्ये त्यांना स्थानिक अधिकाऱ्यांच्या जोडीने एक अधिकृत स्थान असले पाहिजे. शिवाय जनहितासाठी असलेल्या पंचायत संस्थांनी त्यांच्या कामाकडे अधिक गंभीरपणे लक्ष देण्यास सुरुवात केली पाहिजे.

वैद्यकीय सेवा सुधारण्यासाठी मुळापासून सुधारणा व्हायला हव्यात. अनेक कामे करणारा सेवक किंवा मदतनीस, परिचारिका (सुईण) यांच्या कामाला मान्यता लाभली पाहिजे. यामुळे त्यांना पुरेसे प्रशिक्षण मिळू शकेल; त्यांच्या कामावर लक्ष ठेवता येईल तसेच त्यांची कुशलता व ज्ञान यांची पारख करून ते अद्ययावत ठेवण्याचे प्रयत्न होतील. आरोग्यसेवेचा दर्जा व या कर्मचाऱ्यांकडून समाजाला मिळणारी माहिती यांत सुधारणा होईल. व त्यामुळे काही कालावधीनंतर त्यांचा पुढीलप्रमाणे परिणाम होऊ शकेल. म्हणजे इतर ' वैदू 'च्या सेवेचा दर्जाही उंचावेल.

प्रशिक्षणातून आरोग्यसंवर्धनविषयक सेवांचा गुणवत्ता सुधारेलच असे म्हणता येणार नाही. मग प्रशिक्षित डॉक्टर मंडळींच्या दर्जाविषयीही असे म्हणता येऊ शकेल. या म्हणल्याला आधार आहे. कारण भिकार सेवा वा व्यवहार हा केवळ अज्ञानापोटी होतो असे नाही, तर व्यापारी वृत्ती व विवेकपूर्ण व्यवहार यांच्यातील परस्परविरोधी ताणातून तो येतो. याकरिता सामाजिक–राजकीय वातावरणात बदल होण्याची गरज आहे. आणि ही गोष्ट सामाजिक व राजकीय नेते मंडळींचा वकूब व इच्छाशक्ती यांवर अवलंबून असते. तथापि बिनचूक ज्ञानाअभावी व्यवसायात असा बदल होण्याची अपेक्षा बाळगता येत नाही. म्हणून कर्मचाऱ्यांना योग्य व्यावसायिक ज्ञान व कुशलता स्थानिक पातळीवर उपलब्ध करून देण्यापासून असे प्रयत्न सुरू व्हायला हवेत.

अल्पकालीन प्रशिक्षणाद्वारे या कर्मचाऱ्यांची पुरेशी तयारी करून घेण्यासाठी नवीन मार्ग चोखळण्याची गरज आहे. याचा लाभ अधिकृत डॉक्टरांनाही मिळू शकेल. ही नवीन वहिवाट पाडण्यामध्ये वैद्यकीय महाविद्यालयांमार्फतही समरसून प्रयत्न व्हायला हवेत. वैद्यकीय व्यवस्थापनाच्या व्यवहारात वापरले जाणारे विविध मार्ग तपासून घ्यायला हवेत. यामुळे वैद्यकीय महाविद्यालयातील काही डॉक्टरांची काम करण्याची तऱ्हा नव्याने ठरवावी लागेल. त्यामुळे ते परदेशी संशोधनाची नक्कल न करता स्थानिक स्थितीची दखल घेऊ लागतील. म्हणजे विलायती रोग वा लक्षणसमूह यांऐवजी येथील नित्याच्या आजारांकडे लक्ष देतील.

सर्व कामे करणारा सेवक/परिचारिका यांचे काम केवळ उपचार करणे आहे आणि रोगप्रतिबंधक कामासाठी स्वतंत्र यंत्रणेची गरज आहे, असा या सूचनेचा मथितार्थ नाही. तथापि त्यांच्या कामाची फेररचना करणे आवश्यक आहे. त्यामुळे ते या दोन्ही तऱ्हेच्या सेवांचा मेळ घालू शकतील.

प्राथमिक आरोग्यसंवर्धन सेवांचा पाठपुरावा प्राथमिक आरोग्य केंद्रे व उपकेंद्रे यांच्याप्रमाणेच जिल्हा रुग्णालये, वैद्यकीय महाविद्यालये यांनीही

करायला हवा. रुग्णालयांची कार्यक्षमता वाढविण्यास अग्रक्रम दिला पाहिजे. या सार्वजनिक अकार्यक्षमतेवर खासगीकरण हा उपाय सुचविण्यात येतो. पण हा मोह टाळायला हवा. शासनाने अशा रुग्णालयांच्या पाठीशी उभे राहायला हवे. उलट, व्यापारी वृत्तीने चालविण्यात येणाऱ्या खासगी रुग्णालयांना जमीन, उपकरणांची आयात वगैरे बाबतींत कसलीच सवलत देऊ नये. कारण गरीब जनतेपुढील आरोग्यसंवर्धन-विषयक प्रश्नांची सोडवणूक अशी रुग्णालये करू शकत नाहीत. उलट, खासगी रुग्णालयांमुळे सार्वजनिक रुग्णालयांत करावयाच्या सुधारणांकडे दुर्लक्ष होण्याची शक्यता आहे.

सुखवस्तू लोकांनी सार्वजनिक आरोग्यसेवांचा लाभ घेतल्यास त्यांचा मोबदला दिला पाहिजे, असेही या मसुद्यात सुचविण्यात आले आहे. यानुसार मोबदला हा उत्पन्न व न्याय यांनुसार घ्यावा असेही म्हटले असून हे निर्णय कठोरपणे घ्यावेत अशीही अपेक्षा आहे. अर्थात ही सूचना भरीव म्हणता येईल अशी दिसत नाही. कारण एकाच तऱ्हेच्या सेवेसाठी वेगवेगळा मोबदला आकारण्याची यंत्रणा चालण्यासारखी नाही. आणि जरी व्यवहारात वापरण्यालायक अशी यंत्रणा उभारली, तरी तिच्यामार्फत पुरविल्या जाणाऱ्या आरोग्य-सेवेचा दर्जा वेगवेगळा असेल. पैसे मोजणाऱ्यांना अधिक चांगल्या सेवा मिळतील. अशा सुखवस्तू लोकांकडून कराच्या रूपात असा खर्च वसूल केला व सर्वांना आरोग्यसेवा मोफत पुरविल्यास ते अधिक रास्त ठरेल. निदान तत्त्वतः तरी या पद्धतीत गरजेनुरूप सेवा मिळतील, खर्च करण्याच्या कुवतीनुसार नव्हे !

परंपरागत आरोग्यविषयक पद्धतींचे तातडीने पुनरुज्जीवन होणे आवश्यक आहे. यामुळे निदान नेहमीच्या दुखण्यांवर घरच्या घरी उपचार करता येतील. हे उपचार लोकस्वास्थ्य परंपरा संवर्धन समितीने तपशिलवारपणे व अगदी काटेकोरपणे ठरविले आहेत. ते काळजीपूर्वक तपासून घेतले पाहिजेत व त्यांना आरोग्य-विषयक धोरणात महत्त्वाचे स्थान दिले पाहिजे.

या मसुद्यात आरोग्य पद्धतीला नवीन वळण देत असताना परंपरागत पद्धतींवर भर देण्यात आलेला आहे. "परंपरागत पद्धतींमधील साध्या, स्वस्त पद्धती व उपचार यांचा वापर करून घेऊन आरोग्यसेवा समृद्ध करावी" केवळ हाच मुद्दा यात आलेला आहे.



यातून केवळ आयुर्वेदीय औषध कंपन्यांना प्रोत्साहन मिळेल. 'परंपरागत' पद्धतीतील काही उपाय 'आधुनिक' पद्धतीत अंतर्भूत करणे ही काही खरी गरज नाही. तर परंपरागत पद्धतीत परत प्राण फुंकणे व त्यांना त्यांचे समाजातील सर्वोच्च स्थान मिळवून देणे ही खरी गरज आहे.

आरोग्यविषयक व्यावसायिकांची वृत्ती बदलणे गरजेचे आहे. या मसुद्यामधला पुढील मुद्दा रास्तच आहे : "वैद्यकीय शिक्षण पद्धतीचे स्वरूप सुधारले, तरच देशातील आरोग्यसंवर्धनाच्या यंत्रणा प्रभावी होऊ शकतील." मात्र हे कसे करावे याविषयी मसुद्यात कोणताही विधायक उपाय सुचविण्यात आलेला नाही. असे प्रयत्न यापूर्वीही करण्यात आलेले आहेत. पण त्यांत मामुली यश मिळू शकले. या वेळीच असे प्रयत्न कसे आगळे ठरतील ?

या संदर्भात नेमलेल्या भोर व सोखे या समित्यांचा मनुष्यबळ विकासाविषयीचा दृष्टिकोण मूलतः वेगळा होता. मात्र याचा कधीच गंभीरपणे विचार करण्यात आला नाही. सोखे समितीनुसार असा विकास पिरॅमिडच्या तळाशी सुरू होऊन हळूहळू वरच्या दिशेने होत गेला. जर याची थोडीफार अंमलबजावणी करता आली व हल्लीच्या परिस्थितीला अनुरूप सुधारणा केल्यास आरोग्यसंवर्धन पद्धतीत विधायक बदल होऊ शकतील. उदाहरणार्थ, सर्व कामे करणारा सेवक/परिचारिका यांना कुशलता संपादण्यासाठी प्रोत्साहन द्यायचे व ठरावीक वर्षांची सेवा झाल्यानंतर त्यांच्यामधील सर्वोत्कृष्ट व्यक्तींची निवड डॉक्टरांसाठी असलेल्या प्रशिक्षणासाठी करायची. त्यांच्याकरिता वैद्यकीय महाविद्यालयांतून ठरावीक प्रमाणात जागा राखून ठेवता येतील. तेथे त्यांच्याकडे कमी दर्जाचे नव्हे तर वरिष्ठ दर्जाचे डॉक्टर म्हणूनच पाहिले गेले पाहिजे. त्यांची सामाजिक–आर्थिक पार्श्वभूमी, परिपक्वता आणि प्रत्यक्ष व्यवसायात घेतलेला अनुभव यांद्वारे वैद्यकीय पदवीधरांचे स्वरूप हळूहळू बदलेल. म्हणजे प्रशिक्षणाच्या शेवटी नवीन पठडीतील डॉक्टर असतील. असे विधायक बदल घडवून आणण्यासाठी जबर राजकीय इच्छाशक्तीची आवश्यकता आहे.

एकूण आरोग्य पद्धती, सामाजिक–राजकीय परिस्थिती आणि प्रभावशाली प्रचलित मूल्ये यांनुसार शिकणाऱ्या डॉक्टरची मनोवृत्ती घडत जाते. प्रशिक्षणा-



अनुक्रमणिका

साठी भरती करणाऱ्या यंत्रणेपासून ते प्रशिक्षणाच्या पद्धतीपर्यंत तसेच प्रशिक्षणामागील अंतिम उद्दिष्ट या सर्वांचा परिणाम वैद्यकीय विद्यार्थ्यांची गुणवत्ता व वृत्ती यांवर होतो. हल्ली वैद्यकीय महाविद्यालयात प्रवेश घेतानाच विद्यार्थी काही मूल्ये व महत्त्वाकांक्षा बाळगून असतो. अतिशय परिणामकारक शिक्षण व प्रशिक्षण यांच्याद्वारेच यांमध्ये काही प्रमाणात बदल होऊ शकेल. व्यापक सामाजिक मूल्ये विधायक स्वरूपाची असल्यासच डॉक्टरची मनोवृत्ती विधायक होईल.

याचप्रमाणे आरोग्य हा उघडपणे जेव्हा अधिक व्यापक अशा सामाजिक काळजीचा विषय होईल, तेव्हाच रोगप्रतिबंधात्मक घटक अधिक गंभीरपणे विचारात घेतला जाईल आणि त्याची रोगोपचारा-सारख्या रुग्णालयातील कामांशी सांगड घालण्याचे प्रयत्न होतील. राष्ट्रीय विकासविषयक धोरण आणि नियोजन यांतील एक उद्दिष्ट म्हणून आरोग्याकडे पाहिले जाऊ लागले, तर त्यामुळे एक सर्वसाधारण वातावरण तयार होईल. या परिस्थितीत आरोग्य हा चिंता करण्यासारखा प्रमुख विषय होईल. हा नियोजन आयोगाचा विषय आहे; परंतु त्याहून अधिक प्रमाणात हा राजकीय प्रश्नही आहे. नियोजनआयोग हा विषय चर्चेला पुढे ठेवू शकेल, त्यानुसार योजना आखील व त्यावरील चर्चा सुरू करू शकेल. मात्र त्याची अंमल-बजावणी करण्यास शासन पुढाकार घेण्यास कितपत राजी आहे ?

नियोजनआयोगाच्या सदर पथदर्शक मसुद्याने आशादायक सुरुवात केली आहे. तीनुसार आर्थिक नियोजनाकडून सामाजिक उद्दिष्टांकडे वाटचाल सुरू झाली आहे. विकेंद्रीकरण व रोजगारनिर्मिती या दिशेने पुढील पाऊल पडले आहे. आरोग्याचा दर्जा सुधारणे व कुटुंबनियोजनाला प्रोत्साहन देणे या दृष्टींनी हा प्रमुख टप्पा ठरेल. तथापि या मसुद्यातही आरोग्य-सेवांमधील सुधारणा ह्या लोकांचे जीवन सुधारणारा एक घटक आहेत असे समजण्यात आलेले दिसत नाही. कामगारवर्गाची उत्पादनक्षमता वाढविणे व कुटुंब-नियोजनाला प्रोत्साहन देणे या केवळ दोन गोष्टींवरूनही या सुधारणांची निकड जाणवते. हे चित्र आशादायक म्हणता येणार नाही.

* *








# कन्नड-मराठी रंगभूमीवरील देवाण-घेवाण

प्रल्हाद मुदगल

किर्लोस्कर नाटक मंडळीने मराठी संगीत शाकुंतल नाटकाचा पहिला प्रयोग ३१ ऑक्टोबर १९८० रोजी पुण्यात रंगभूमीवर सादर केला. लोकमान्य टिळकांनी मराठी शाकुंतल नाटक पाहून त्याची खूप प्रशंसा केली.

डॉ. एच. के. रंगनाथ यांनी आपल्या "कर्नाटक थीएटर" या संशोधनपर ग्रंथात खालील आशयाचा उल्लेख केला आहे : "बेळगावचे श्री. चुरमुरी शेषगिरीराव यांनी १८६९–७० मध्ये कालिदासाच्या 'शाकुंतल' नाटकाचे कन्नड भाषेत भाषांतर केले. शाकुंतलाचे हे कन्नड भाषेतले पहिलेच भाषांतर होय. त्याचे लगेच प्रकाशनही झाले. पण ते रंगभूमीवर येण्यास तीन दशकांची वाट पाहावी लागली. दरम्यानच्या काळात या भाषांतरातील कविता आणि पदे मात्र लोकप्रिय झाली. लोकगीतांच्या चालीवर आणि सुपरिचित अशा कर्नाटकी रागदारीवर ती गीतें रचलेली होती. या चाली आणि शेषगिरीराव यांचे नाट्यरचनातंत्र यांनी अण्णासाहेबांचे मन वेधून घेतले. अण्णासाहेब हे शेषगिरीराव यांचे मित्र होते. शेषगिरीरावांच्या या भाषांतरित शाकुंतलाच्या निर्मितीमागील नवकल्पना रंगभूमीवर क्रांती घडवून आणणाऱ्या आहेत, असे अण्णासाहेबांना वाटले. त्यांनी शेषगिरीरावांच्या पद्धतीने मराठीत शाकुंतल नाटक आणले."

आम्हा वाचकांना अण्णासाहेब किर्लोस्करांचे जीवन आणि कार्य परिचित आहे. पण त्यांचे मित्र आणि स्फूर्तिदाते चुरमुरी यांच्याबद्दल फारच कमी माहिती आहे. त्यांनी मराठी आणि कन्नड साहित्यांत भरीव कार्य केले; असे सांगायला काही मराठी लेख आणि कन्नड शाकुंतल नाटक एवढेच आधार आहेत. त्यांचे विश्वसनीय चरित्र उपलब्ध नाही. त्यांचे एखादे छायाचित्र किंवा पत्रव्यवहारही मिळत नाही. तरीही कन्नड आणि मराठी नाट्यरसिक आणि संशोधक चुरमुरींचा उल्लेख या–ना–त्या रीतीने केल्याशिवाय पुढे जात नाहीत.

चुरमुरींचे संपूर्ण नाव शेषगिरी रामचंद्र चुरमुरी. यांचे वाडवडील बेळगाव जिल्ह्यातील रामदुर्गचे रहिवासी होते. तेथे कन्नड आणि मराठी भाषा व्यवहारात होत्या. उत्तर कर्नाटकातील चार जिल्हे– विजापूर, बेळगाव, धारवाड, कारवार येथील भाषा कन्नड आहे. ही वस्तुस्थिती त्या काळातील ब्रिटिश सरकारला १८३५ मध्ये कळून आली.

चुरमुरींच्या पूर्वजांचे आडनाव 'मुदकवी' असे होते. त्यांचे पूर्वज रामदुर्गहून धारवाडला काही कारणास्तव बिऱ्हाड घेऊन आले आणि उदरनिर्वाहासाठी चुरमुरी नावाच्या एका प्रसिद्ध वीरशैव व्यापाऱ्याचे मुख्य गुमास्त्याचे काम करू लागले. कालांतराने "मुदकवी" चुरमुरी या नावाने ओळखले जाऊ लागले. शेषगिरींचे वडील रामचंद्रराव पोलिस खात्यात फौजदार होते. काही कारणास्तव त्यांनी नोकरी सोडून दिली. आणि उरलेले आपले आयुष्य ऐषारामात घालवू लागले. संगीतकलेत, मराठी आणि कन्नड साहित्यांत अभिरुची असलेल्या रामचंद्ररावांना "गवई रामचंद्र" म्हणून त्यांचे मित्र ओळखत होते. शेषगिरी रामचंद्ररावांचा थोरला मुलगा, जन्म १८२७. घरातील संगीतमय वातावरणात वाढलेला. वडिलांच्या संगीत मैफलीत आस्थेने भाग घ्यायचा. नाट्यकलेतील कुशलता आणि संगीत-पांडित्य त्याने आपल्या वडिलांपासून घेतले. कन्नड कवी लक्ष्मीशांच्या "जैमिनी भारताने" व घरातील संगीताच्या वातावरणामुळे त्यांचे मन संगीताकडे आकर्षित झाले. संगीताचा ध्यास हा त्यांच्या जीवनाचा स्थायीभाव बनून त्यात त्यांनी प्रावीण्य मिळविले.

प्राथमिक शिक्षणानंतर उच्च शिक्षणासाठी शेषगिरी पुण्याला गेले. पुण्यात इंजिनिअरिंगचे शिक्षण घेत असताना, आपल्या कन्नड आणि मराठी मित्रांना आपल्या संगीत जलशांनी त्यांनी आकर्षित केले. स्वभावतः शेषगिरी फार बोलके नव्हते. नोंदी-टिपणे

करून ठेवण्याची सवयदेखील त्यांच्या स्वभावात नव्हती. ते मित्रांशी व आप्त मंडळींशी पूर्वायुष्याबद्दल मोकळ्या मनाने बोलत. पुण्यातील वास्तव्यात त्यांचा परिचय थोर शिक्षणतज्ज्ञ चन्नबसप्पा धारवाड यांच्याशी झाला, आणि पुढे त्यांना शेषगिरी यांनी आपले साहित्यिक-गुरू मानले.

सिव्हिल इंजिनिअरिंगचा अभ्यास पूर्ण केल्यावर शेषगिरींनी पब्लिक वर्क्स खात्यात ओव्हरसीअरचे काम पत्करले. हे एक दक्ष अधिकारी आहेत, असे त्यांचे वरिष्ठ अधिकारी मानत होते. दगडमातीच्या सृष्टीत नवे जग पाहण्याची दिव्य दृष्टी त्यांना लाभली होती. आपले काम संपवून घरी परतल्यावर ते कामाला लागणाऱ्या वेगवेगळ्या यांत्रिक साधनांच्या तयारीला लागत असत. शिल्पकलेतही त्यांनी खूपच प्रावीण्य संपादन केले मुंबईच्या भूविस्तार योजनेत ते इंजिनिअर म्हणून जबाबदार अधिकारी होते.

शेषगिरींच्या धर्मपत्नीचे नाव भीमाबाई असे होते. मुंबईत असताना दोन मुलींची जबाबदारी पतीवर सोडून ती परलोकवासी झाली. पण मुलींची पुढची जबाबदारी शेषगिरींचे चुलते–श्रीकृष्णराव यांनी पार पाडली. आपल्या मुंबईच्या वास्तव्यात शेषगिरींनी मराठी भाषेत लेख लिहून "विविधज्ञानविस्तार" पत्रिकेत प्रकाशित केले. त्यात लक्ष्मीश कवींचा जैमिनी भारतातील पीठिका संधीचा मराठी अनुवाद, "कानडी भाषा", "बहिर्लापिका (कोडी) कवितासंग्रह" इत्यादी लेखांबद्दल माहिती आढळते.

"कानडी भाषा" या लेखात त्यांचे मराठी, कन्नड आणि लॅटिन भाषेवरील प्रभुत्व दिसून येते. आपल्या ह्या लेखाच्या प्रारंभी ते म्हणतात, "आमच्या देशामध्ये इंग्रजी राज्य जाहल्यापासून विद्येच्या कामामध्ये सुधारणा व नवीन नवीन शोध वाढत चालले आहेत, हे सर्व लोक कबूल करितात. पश्चिम देशीय लोकांचा शोधकपणा विशेष आहे. व त्यांच्या शोधांना राज्याधिकाऱ्यांचे साहाय्य असल्यामुळे ते पुष्कळ अंशी आधारयुक्त असतात. त्यांत संशय नाही. तथापि सर्वच गोष्टींमध्ये त्यांचे शोध खरे असतात; असे मानणे व त्यांच्या शोधावर विशेष शोध करण्यास जागा राहिली नाही, असे म्हणणे हे वेडेपणाचे आहे. अशा प्रकारच्या इतर गोष्टींमध्ये मुख्यत्वेकरून आमच्या देशासंबंधी, जे त्या लोकांनी आपले विचार लिहिले आहेत, ते बहुधा आमच्या लोकांच्या विचाराला पात्र असतात. कारण एखादा प्रसिद्धीस आलेला तद्देशीय विद्वान इकडे येऊन आपल्या मनावर झालेला ग्रह खरा-खोटा असेल त्याप्रमाणे, तिकडे गेल्यावर या देशाविषयीचे आपले विचार प्रगट करितो. नंतर तिकडील विद्वान त्या ग्रंथावर आपली कल्पना चालवून, दुसरे ग्रंथ रचतात. एखादे वेळी प्रथमचा ग्रंथकार प्रतिष्ठित असला तर त्याने जे म्हंटले ते कायम होऊन जाते, किंवा एखादे वेळी कल्पनेवर कल्पना वाढतां वाढतां शेवटी तिचा असा परिणाम होतो कीं, जी गोष्ट हिंदुस्थानामध्ये वास्तविक मान्य आहे व जी सिद्ध करण्यांस हिंदुस्थानच्या लोकांस कांहीं अडचण पडत नाही, ती गोष्ट तशी नाही तिच्या उलट आहे, असे त्यांच्या पांडित्यामध्ये ठरते." ...... त्यांच्या या सांगण्यावरून त्यांच्यातील संशोधक प्रवृत्ती कशी होती हे दिसून येते.

"स्फुटविषयक– बहिर्लापिका (कोडी)" ह्यातील काही पदे खाली दिली आहेत. त्यांच्या कवित्व प्रतिभाशक्तीची ही साक्षच आहे.

१) यंत्रशास्त्रांतील मुख्य पदार्थ, मळसूत्र, चक्र, तरफ आणि अक्ष किंवा चक्राचा कणा ही जिची आयुधे- (शंक, चक्र, गदा, पद्म या रूपांनी) जाहली आहेत, त्या आदिशक्तीस नमस्कार करताना लिहितात–

"ज्यांचे वर्णन विस्तरेंचि करिती त्या यंत्र शास्त्रीजनी। ज्यांते जाणुनि पूर्ण ताम्रमुखि जे गेले घराण्यापुनी। शस्त्रे ऐसि घरी करी सतत त्या शक्तिस मी वंदितो। भावे नम्रपणे मनीस दृढता निर्विघ्नता मागतो." २) कोळी गळास एक कीटक लावून मासे मारीत असतां, कीटक माशास म्हणतो–

"आलासि तू मजकडे मन मोहुनीया। तो बैसुनी ठपतसे तुज मृत्यु द्याया। माझा असू दुखवला तुजलागि मेला। मारील जा मजमुळे मुकसी जिवाला।।" ३) "आरशी पहाणाऱ्यास, म्हणते प्रथमत: पुरुष मिशावर ताव देतो, नंतर दात काढितो, व जीभ काढितो" या कल्पनेच्या दृष्टीने–

"नाजुक मी असुनि देखुनि वीर होसी। मागोनि मर्कट जसा दिससी जनासी। पाहोनि चंड मृग वल्करिसी मुखासी। मी रम्य निर्मल अशी असता कशासी"

"जैमिनी भारत" या कन्नड महाकाव्य ग्रंथाचे मराठी भाषांतर करताना शेषगिरीराव आपल्या

प्रस्तावनेत म्हणतात, 'कर्नाटक भाषेमध्ये जे उत्तम कवी होऊन गेले त्यांपैकी लक्ष्मीश नामे करून जो झाला तो सर्वांत श्रेष्ठ असे मानिले आहे. याकरिता त्याची कविता कशी आहे, हे आमच्या महाराष्ट्र देशीय विद्वज्जनांस कळण्याकरिता त्याने केलेले "जैमिनी भारत" याचे मी यथानुशक्ती महाराष्ट्रीमध्ये भाषांतर करीत आहे. त्यांत चुका असतील त्या टाकून त्यातील गुणांचे मात्र ग्रहण करावे ही विद्वज्जनांस विनयपूर्वक प्रार्थना आहे' असे प्रारंभी आपल्या भावना व्यक्त करून–प्रस्तावनेच्या शेवटी –

अपूर्व भव पित्तहारक असे मिळालेच की ।
मला सुफल हे नवे सुरस रान कर्नाटकी ।
न खाइनचि भिल्ल मी बुधजनांसि शाबासकी ।
जिला विकिन तीच मानिन चिमच्छमा दीडकी ।

असे एक पद्य लिहिले आहे.

'विविधज्ञानविस्तार'मध्ये प्रकाशित होत असलेल्या चुरमुरींचे लेख वाचून डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर श्री. चन्नबसप्पा, धारवाड यांनी चुरमुरी यांना "कन्नड भाषेच्या त्या वेळच्या दुरवस्थेची जाणीव करून दिली. कन्नड भाषेत एखादे चांगले कार्य करण्यासाठी प्रत्येक सुशिक्षिताने आपली बुद्धी आणि भाषा वापरली पाहिजे" असे सुचविले. ह्याचाच परिणाम की काय त्यांनी १८६९ च्या सुमारास महाकवी कालिदासांच्या "अभिज्ञान शाकुंतलम्" नाटकाचा कन्नड भाषेत अनुवाद केला. 'मुंबई एज्युकेशनल सोसायटी' छापखान्यात त्याचे मुद्रण करून प्रसिद्ध केले. त्यांनी आपल्या ह्या कृतीत चन्नबसप्पांना "गरिबांचा वाली" असे संबोधिले आहे.

कृ. बा. मराठे यांनी "मराठी रंगभूमीचा पूर्वरंग" नावाचे पुस्तक लिहिले आहे. त्यात 'संगीत शाकुंतल रंगभूमीवरील क्रांती' या सदराखाली "कन्नड शाकुंतल इ. स. १८८० च्या मागे-पुढे केव्हातरी प्रसिद्ध झाले असावे हे उघड होते." असे चुरमुरीकृत शाकुंतल नाटकाबद्दल म्हटले आहे. माझ्याजवळ जगातील सर्व भाषांत 'शाकुंतल नाटक' केव्हा आणि कधी अनुवादित व रूपांतरित झाले ह्याबद्दल समग्र माहिती असल्यामुळे चुरमुरी यांनी 'अभिज्ञान शाकुंतलम्' नाटकाचे कन्नड भाषांतर १८६९–७० मध्ये केले असे ठाम विधान करता येईल. शिवाय "कन्नड भाषांतर संपूर्ण मिती" या सदराखाली लिहिलेल्या पद्याचा अर्थ– शालिवाहन शके १७९१ शुक्ल संवत्सर पुष्यमास बहुळ चतुर्थी (संकष्टी) शुक्रवारच्या दिवशी भाषांतर पूर्ण केले असा होतो.

आतापर्यंत चुरमुरींचे शाकुंतल हे नाटक चार वेळा मुद्रित झाले आहे. कन्नड भाषेतील शाकुंतल नाटकात चुरमुरींनी कन्नड-मराठी-हिन्दी भाषांतील लोकगीते वापरून नवीन चाली दिल्या आहेत. संभाषणात नावीन्यता आणली आहे. विदुषकांचे संभाषण वाचून अजूनही वाचक पोट दुखेपर्यंत हसतात. त्यांच्या प्रतिभेची भरारी व नाटचगुणांचा आविष्कार यांचा सुंदर मिलाप ह्या नाटचकृतीत दिसून येतो.

शेषगिरीरावांनी आपले शाकुंतल नाटक १८६९–७० साली प्रसिद्ध केले, तरी रंगभूमीवर यायला त्याला तीन दशके लागली. तरीही ह्या नाटकातील गाणी आधीच प्रसिद्ध झाली होती. गौरी व गंगेच्या आरतीच्या वेळी, संगीत जलशात, लग्नसमारंभात इत्यादी शुभ-प्रसंगी स्त्री-पुरुष गाऊन आनंद लुटत होते. ह्या नाटकाचा संपूर्ण प्रयोग चुरमुरींचे चुलत भाऊ यांनी १९०५ साली पाहून "माझा भाऊ पुनर्जन्म घेऊन आला" असे उद्गार काढले.

चुरमुरी यांनी मराठी भाषेत "स्नेहाविषयी निबंध" अशा शीर्षकाची एक पुस्तिका प्रकाशित केली. लाहोर येथे एका सम्मेलनात १८७५ साली त्यांनी ती वाचली होती. या पुस्तिकेचा समावेश, दाते यांच्या ग्रंथसूचीमध्ये रामचंद्र शेषो ह्या लेखक-नावाने आढळतो. शिवाय कन्नड भाषेत "संस्कृत मृच्छकटिक" नाटकाचेही त्यांनी भाषांतर केले होते. ते नाटक 'बेळगाव समाचार' मुद्रणालयात छपाईला पाठविले होते. परंतु ते काम पुरे होण्यापूर्वीच मातीच्या भांड्यांवरील रंगकाम कसे करता येईल याबद्दल प्रयोग करीत असतानाच विषारी वायू पोटात गेल्यामुळे दिनांक २–६–१८८२ रोजी शेषगिरीराव परलोकवासी झाले.

अण्णासाहेब किर्लोस्कर १८६६ ते १८८० ह्या कालखंडात बेळगाव आणि धारवाड येथे राहात होते. त्याच काळात चुरमुरींच्या कन्नड शाकुंतल नाटकाचा सुशिक्षितांवर किती प्रभाव पडला होता याचे प्रत्यक्ष वर्णन मुदवीडू कृष्णराव खालीलप्रमाणे करितात ( मुदवीडू हे कन्नड-मराठी भाषापंडित होते, हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे.).– "चुरमुरींचे नाव कन्नड रंगभूमीवर अमर राहील अशी त्यांची कलाकृती



अनुक्रमणिका

म्हणजे शाकुंतल नाटक. यापूर्वी त्यांनी मराठी भाषेत काव्यरचना आणि लेखन केले होते. पण नाटककार म्हणून त्यांचे नाव सर्वतोमुखी झाले, ते शाकुंतल नाटकानेच. त्यातील नाटच व काव्यगुणांनी त्यांनी आपली स्वतंत्र प्रतिभा सिद्ध केली आहे. नाटचप्रसंग, भाषाशैली, कथाभागाशी एकरूप होणारी सुरस पद्यरचना इत्यादी गुण येथे आम्हाला आढळतात. लग्नात मुलीला सासरी पाठवताना कण्व ऋषींनी शकुंतलेला केलेले उपदेशपर पद सुशिक्षित प्रौढ गृहिणींच्या तोंडून ऐकायला मिळते. उत्सवप्रसंगी अथवा करमणुकीसाठी होणाऱ्या खासगी बैठकीतून गवयांना ह्या नाटकातील पदे म्हणण्याविषयी श्रोतृवर्गाचा आग्रह होई. लोक बैठकीत तन्मय झाले असताना शाकुंतल नाटकातील एखादे पद म्हटल्याशिवाय रंभाजीस विडा मिळत नसे. मेजवानीचा कोणताही प्रसंग चुरमुरींच्या पदाशिवाय साजरा होत नसे."

अण्णासाहेब किर्लोस्कर आणि शेषगिरीराव चुरमुरी दोघेही मित्र होते असे मानायला काही आधारही आहेत. त्या काळात सुशिक्षितांचे बेळगावात १.९७ टक्के प्रमाण होते आणि धारवाड येथे हेच १.५९ टक्के प्रमाण होते. दोघेही रसिक कवी आणि दोन्ही भाषेत प्रावीण्य मिळविलेले होते. किर्लोस्करांनी शिक्षक म्हणून शिक्षण अधिकारी रसेल ह्यांच्या हाताखाली काम केले. त्या काळी डेप्युटीच्या हुद्द्यावर (चन्नबसप्पा धारवाड होते. तेही रसिक साहित्यिक आणि कन्नड-मराठी भाषापंडित होते. मराठी आणि कन्नड साहित्यांत त्यांनी मौलिक भर टाकलेली आहे.) प्रतिभासंपन्न व्यक्तींना प्रोत्साहन देण्यात त्यांचा नावलौकिक होता. सार्वजनिक बांधकाम खात्यात चुरमुरी काम करीत असताना विभागीय कार्यालय बेळगावला होते. ऑफिसच्या कामानिमित्त चुरमुरी बेळगावला नेहमी भेट देत असावेत. अण्णासाहेबांचे जन्मस्थळ गुर्लहोसूर-एक तीर्थक्षेत्र म्हणून प्रसिद्ध होते. सवदत्ती येथे चुरमुरींचे चुलते कृष्णराव हे वकील होते व रसिक कवीही होते.

"किर्लोस्करी शाकुंतलाची प्रेरणा" याविषयी विचार करताना इ. स. १८६० मध्येच 'दक्षिणा-प्राईज' कमिटीने प्रशंसा करून "प्राईज" दिलेल्या श्री. कृष्णशास्त्री राजवाडेकृत मराठी शाकुंतल, पहिली आवृत्ती १८६९ मध्ये प्रसिद्ध झाली. परशुरामपंत गोडबोले यांनी १८६१ मध्ये, रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांनी १८७० मध्ये मराठी भाषेत आणि १८६९ साली शेषगिरीराव चुरमुरी यांनी कन्नड भाषेत भाषांतर करून प्रकाशित केलेले शाकुंतल नाटक लक्षात घ्यावे लागेल. अण्णासाहेब किर्लोस्करांनी, आपल्या शाकुंतल नाटकाचे प्रयोग रंगविण्यासाठी तंत्र आणि मंत्र यशस्वीपणे आत्मसात कशा प्रकारे केले, प्रेरणा कशी मिळविली ह्यांबद्दल चुरमुरींच्या शाकुंतल नाटकातून काही उदाहरणे घेणे उचित वाटते. "कन्नड शाकुंतल नाटक मुंबईत १८६९-७० मध्ये प्रकाशित होण्यापूर्वी परशुरामपंत गोडबोले ह्यांनी १८६१ मध्ये शाकुंतल नाटकाचा मराठीत अनुवाद करून तो प्रकाशित केला होता. चुरमुरींच्या कन्नड शाकुंतल नाटकावर ह्याचा प्रभाव झाला असावा असे वाटते. त्यानंतर १८६० मध्ये 'दक्षिणा-प्राईज' मिळविलेले श्री. कृष्णशास्त्री राजवाडे यांचे शाकुंतल नाटक १८६९ मध्ये प्रकाशित झाले. चुरमुरी किंवा अण्णासाहेबांच्या शाकुंतल नाटकावर ह्याच्या प्रभावाबद्दल आधार दिसून येत नाही. "विविधज्ञानविस्तार" पत्रिकेत १८६७ ते १८७० या कालखंडात गणपत कृष्ण गुंजीकरकृत शाकुंतलाचे मराठी रूपांतर क्रमशः प्रकाशित होत असे. चुरमुरी आणि अण्णासाहेब ह्यांच्यावर त्याचा प्रभाव पडला असावा असे वाटते. अण्णासाहेबांनी शाकुंतल हे नाटक लिहिण्यापूर्वी गोडबोले, गुंजीकर आणि चुरमुरी यांच्या शाकुंतलाचे अध्ययन केले असावे असे प्रतिपादन करण्याच्या दृष्टीने काही उदाहरणे खाली देत आहे–

संस्कृत :

> अस्मात्परं बत यथाश्रुति संभृतानि
> कोंनः कुलें निवपनानि करिष्यतीति
> नूनं प्रसूतिविकलेंन मया प्रसिक्तं
> धौताश्रु शेष मुदकं पितरः पिबंति ॥ ६·२४ ॥

गोडबोले :

> नित्यतर्पणी उदक वाहिले त्याने
> अश्रुधजोनी उरले, तेच पिती मत्पितर......

राजवाडे :

> जळ त्याणे ते अश्रु धुवोनी पीति
> शेष जळाला......

गुंजीकर :

> माझ्या नेत्रातून जे अश्रूंचे लोट वाहत आहेत

त्यांचे सांचलेले उदक पीत असतील यात
संशय नाही......

चुरमुरी :

संतति गळिळेम्ब कष्ठदी संतत ढोळश्रुगळ
सुरिसलवन्ने

गुटुकिपरू......

किर्लोस्कर :

संतति विरहि जो मी त्याच्या
अश्रू जलाची करोत किं पाने......

संस्कृत :

न खलु न खलु बाणः सन्निपात्योऽय मस्मिन्
(१·१०) आणि-तत्साधुकृत संधानं प्रतिसंहर
सायकं

आत्र त्राणाय वः शस्त्रं न प्रहत्रुमनागसि (१·११)

चुरमुरी :

अरळुगळळि किच्चं चुच्चिदोळ् वज्र
पोल्वा, सरळ नेसिय बेडै कोमलांगक्के
चल्वा, एरळिय मृदु जीवक्कलल
निन्नस्त्र व्यर्था दुरूळरिनुरे पीडा पडदरं वालनार्था.

किर्लोस्कर :

शशिकुलभूषण गुणवंता । ऐकें मद्वच दुष्यंता ।।धृ।।
अग्नि पुष्पांवरि जैसा । टाकुं नको शर मृगि तैसा ।।
कोठें मुदुतनु मृग ऐसा । कोठें बाण तुझा पविसा
यास्तव आवरि नेम कसा । तपोवनिं न करी हे
सहसा ।।
पीडित जन दुःखासि हराया शस्त्रे धीमंता ।।

गोडबोले आणि राजवाडे यांनी संस्कृतातील दोन्ही पद्यांचे भाषांतर वेगवेगळ्या रीतीने केलेले आहे.

संस्कृत :

चित्रें निवेश्य परिकल्पित सत्व योगा
रूपोंच्चयेनें महता विधिना कृता नु ।।
स्त्रीरत्न सृष्ठिरपरा प्रतिभातिसामें
धातुर्विभुत्व मनुचित्य वपुश्च तस्या ।। २·९ ।।

चुरमुरी :

बण्णिसलह्यागिन्नु, नुडियालिला वण्यद
खणियन्नु, कण्णोळू कट्टिद, हेण्णिनरूपवु,
यन्नोळनंगन, सन्निधियंतिरे ।। मोदलुमनसुगोट्टु
विधियु चित्र मुर्दिदे बरदिट्टु, अदर मैयोळु
जीवद कलेयनु तुंबिद म्यालिळेयोळ गुदुभविसि
दळेनो ।।१।। कैनडगुवदेंदु विधातनु ध्यान
दोळगे तंदु मौनदिंदतिशय, मोहदरूपव
घेनिसि पडदिह मानस पुत्रळो ।।२।। यंदिगे
बरबेकं, ब्रह्मनिर्गिथा सुंदर कृति साकं, इंदिरा
रूपव छंददि कलितळंददोळिळसिद
निदिवलाक्षिय ।।३।।

किर्लोस्कर :

काय परम रमणीय सखीचें रूप कथूं तुजला ।।धृ।।
ब्रह्मदेव अधि सुंदर तनुची मूसमनीं ओती ।।
मग बनवी स्त्री सृष्ठिची नूतन काया ऐशीवाटे
होती ।।
चिंतुनि विधिची अगाध लीला पाहुनि त्याच्या
ह्या कृतिला ।। काय परम ।।

गोडबोले :

चित्रा परितनु रचली विधीने ...

राजवाडे :

चित्री घालुनि जीवती रचइली ...

संस्कृत :

दौवारिक : सज्जोरथो भर्तृविजय प्रस्थान मुदीक्षते
ऐष पूननगरा द्वेवीनां सकाशात्करभक आगतः
(अंक – २)

"करभक" म्हणजे "उंट" किंवा "उंटस्वार" असा अर्थ होतो. गोडबोले यांनी आपल्या शाकुंतलात "करभक जासूद" असे म्हटले आहे. राजवाडे यांनी "करभक" हा शब्द निजनाम असावे ह्या भावनेने वापरला. चुरमुरींनी "वंटेसवार" असे म्हटले. किर्लोस्कर यांनी "नगराहून आईसाहेबांकडून करभक सांडणीस्वार" असे म्हटले आहे.

संस्कृत :

पृष्ठा जनेंन समदुःख सुखेंन बाला
नेंयं न वक्षति मनोंगत माधि हेंतुं
दृष्ठों विवृत्य बहुशोऽप्यनया सतृष्ण
मंत्रोंतर श्रवण कातरतां गतोऽस्मि ।। ३·९ ।।

चुरमुरी :

येनेंदु देंवि नुडिवळय्यो, केळुवा नंदवल्ल
दंजुवेनरयो ।। पल्ला ।। चालुवरिवरू बळीयनितु
जीव, दोंलु तिळिव गेळतियरितु, पेळदिरळु
मनसिन मातु इन्नु मेंलेन्न दैववु तिळदीतु ।।१।।
कण्णिनिंदले ममते, यदोंरि, भाव, बन्ने काणसि
हळुवैयारि, इन्ने नेंबुवळों लज्जेय मीरिमन,
सिन्नूबिडदु संशय भारी ।। २ ।। अलरंब गणिदे






म्यालिहे निंदु एडबलदोंळु दुःख सुखद सिंधु ॥
तिळयेनि
वळ नुडिगळु बंदु यन्न यलरि नोंलेते
नूकुर्वविदु ॥ ३ ॥

किर्लोस्कर :

आतां शशि मुखिच्या विकथनीं मज भय वाटतें ॥
आतां ॥ ध्रु ॥
प्रश्न करिति सख्या इस परि हीन बदत हृद्‌गतचिंता॥
नेत्र गरागर फिरवुनि लोभें पाहतसे गुणवंता ॥
आतां ॥

संस्कृत :

प्रियंवदा (विचिंत्य) : अनसूये मदन लेख इदानीं क्रियताम्, तम् सुमनो गोपितं कृत्वा देवता शेषापदेशेन
सत्य राज्ञो हस्ते प्रापयिष्यामि. ( अंक ३ )

चुरमुरी :

प्रियंवदा ( स्वल्पुधेंनिशि ) : आतनिगे प्रीति युक्तवाद मदन लेख वन्नु बरियतक्कद्दु. अदन्नु नानु देंवर निर्माल्यर्वेब निमित्त दिद हूविनल्लि मुच्छि आतनिगे तल्पिसुत्तेने.

किर्लोस्कर :

प्रियंवदा ( विचार करून ) : गडे, मला एक युक्ति सुचली आहे. शकुंतलेने त्याच्या नांवाने एक प्रीति पत्र लिहावे. ते प्रसादाच्या निमित्ताने निर्माल्यांत लपवून मी त्याला पोहचते करते म्हणजे झाले.

" देवता शेषापदेशेन " ह्याचा अर्थ ' निर्माल्य ' असा होतो. चुरमुरी आणि किर्लोस्कर यांनी 'निर्माल्य' या अर्थानेच शब्दप्रयोग केले आहेत. गोडबोले आणि राजवाडे 'देवप्रसाद ', ' देवताप्रसाद ' असे म्हणतात.

संस्कृत :

तवन जानें हृदयं मम पुनः कामोंदिवापी रात्रा वपि ॥
निष्कृप तापयति बलीयांस्त्वयि युक्त मनोरथान्यगानि ॥ ३.१४ ॥

चुरमुरी :

बाबिडिसो मोहन्ना, अंगजतापदिदेन्ना ॥
पल्ल ॥ बिन्नह ॥

माडुवे मनुमथ गेने मन, निन्नपादके शिल्कि
होंइतों ॥ १ ॥
चित्तनिन्नोळु कळदिहेनेंदु चित्तज न त्यंत कोंपव
ताळूदनों ॥ २ ॥
नन्न मनदवालु निन्न पाददरेंणू नीडलवगेतिळहूवेनों ॥ ३ ॥

किर्लोस्कर :

तुझे मन ते ठाऊक मला नाही ॥
दुष्ट छळितो हा मदन कसा पाही ॥
बाण याचे मज फार दुःख देती ॥
भेट देऊनियां करी तापशांती ॥

" भेट देऊनियां करी तापशांती " आणि " बाबिडिसो मोहन्ना अंगजतापदिदेन्ना " ह्यातील स्वतंत्र प्रतिभा ओळखुन जाणकारांनी निर्णय द्यावा ही विनंती. संस्कृत पद्यात अशा रीतीने येणारे भावनापर वाक्य नाही आहे. चुरमुरी आणि किर्लोस्कर यांच्याच पद्यांत मात्र दिसून येत आहे. गोडबोले आणि राजवाडे यांचा अनुवाद मूळ संस्कृत पद्याला अनुसरून आहे असे आम्हांस वाटते.

संस्कृत :

किं शीतलैः क्लमविनोदिभिरार्द्र वातान्संचार यामि
नलिनी दलताल वृंतैः। अंकें निधाय कर भोरू
यथा सुखं तें संवाहयामि चरणावुत पद्मता म्रौ
॥ ३.१९ ॥

चुरमुरी :

बेदरब्याडे मदिर लोंचने ना बळियलिरलु।
बेदरब्याडे केळ् सखियर बदलु सेंवेगासे गोंडु॥
येदुरिनोळ् कै जोडीसीना बदियली निलुतले हलबुवे।
॥ पल्ल ॥ चेलुवे निन्न शरीर तापगळिसुवे न
तोडेयोळिट्ट ॥
नळिनदळव तालवृंत वेळि सुळि तिळि
चळियलरिलि ॥ १ ॥
मनळे बंदर रूणवपदुम पोल्व हिंबुडगळनु कै योळेनगे।
नीडे मेल्लनोत्तुवे मनसिन धन विनति गेणति ॥ २ ॥
नयदि बेंडि कोंबे यन्नोळु दयव माडे मौने निन्नय।
बयकेयंते नडिवे हरिण नय नेयं नय बयलभयबिडु॥३॥

किर्लोस्कर :

भिऊ नको जिवलग सुंदरी कांही दास तुझा जवळि
असे हा
घेऊनि पंकज पत्राचा हा पंखा घालू काय शीत वारा॥






बघही तनु कशी घर्माने डवडबली भिजुनी गेला पदर सारा
सखये मांडीवरी घेऊनी तुझ्या चरणाचुरूं काय पद्यतास्त्रा ॥
शिणवूं नको देहा ॥ भिऊं नको जिवलग सुंदरी कांही ॥ दास ॥

चुरमुरी :

"बेदर ब्याडे मदिर लोंचने ना बळियलिरलु"

किर्लोस्कर :

"भिऊ नको जिवलग सुंदरी कांही दास तुझा जवळि असे हा"

यातील साधर्म्य लक्षात घेण्यासारखे आहे. गोडबोले आणि राजवाडे यांचा अनुवाद मूळ पद्याला अनुसरून आहे.

संस्कृत :

मुहु रंगुलि संवृताध रोष्ठं
प्रतिषे धाक्षर विक्लवाभि रामम्
मुखमं सविवर्ति पक्ष्मलाक्षाः
कथमप्युन्नमितं न चुंबितंतु ॥ ३·२२ ॥

चुरमुरी :

चुंबिसलिल्ला चल्वा संधियोळु ना बिंबाघरेयु
पोंगाळेंबों नंबिके योळु ॥ पल्ला ॥ मेल्लाने नीतें
नुडियू डुतलि मृदुबळ्ळुगळिंद घर मुच्चुतलि रीते
यल्ला वेंबुता न नदिरवुतलि नल्ले कटाक्षदि
नोंडीद समय दोळ् ॥ १ ॥ बळियल्लि बंदु होंदि
कुळ्ळिरलु कैयोळुना चलुव मुख पिडिदिरलु
अरगेलसा माडिदे पूराना मरळु तिळियें
नीव्याळचदोळेल्ली पोदीतों मति ॥ २ ॥ तिरूगि
तरूणि युता बरबहुदु ना नरक्षण गळिये नागलु
मरदुई परियन्न हृदय निश्छयिसुवदु तेरळीरलु
प्रसंग मरगूतिहदु व्यर्था ॥ ३ ॥

किर्लोस्कर :

काय मला भूल पडलि भान हरपलें । तें मुख
वर केलें परी नाही चुंबिले ॥ काय ॥ धृ ॥
सुंदरिनें अंगुलिनी ओठ झांकिले । नको नको
ऐसें म्हणत तोंड फिरविलें ॥ प्रेम भरें तिनें नेत्र
मिटियले ॥ ऐशा त्या ऐन रंगि व्यंग जाहले ॥ काय ॥

"चुंबिसलिल्ला चळवा संधियोळु, कैयोळुना चलुव मुखपिडदिरलु, अरगेलसा माडिदे पूरा ना मरळु तिळियें नीव्याळचदोळेल्ली पोदितो मति." ते मुख वर केले परी नाही चुंबिले, ऐन रंगि व्यंग जाहले, काय मला भूल पडलि भान हरपलें" मूळ संस्कृत पद्यात अशा प्रकाराचा अर्थ लावता येत नाही. फक्त वर नमूद केलेल्या कन्नड-मराठी पद्यांत आढळतो. गोडबाले आणि राजवाडे यांनी मूळ संस्कृत पद्याचाच सरळ अनुवाद केला आहे.

संस्कृत :

रम्यं द्वेष्टि यथा पुरा प्रकृतिभिर्न प्रत्यहं सेव्यते
शय्यों पांत विवर्त नैर्वि गमयत्युन्निद्र एव क्षपाः ॥
दाक्षिण्येंन ददाति वाचमुचिता मंतः पुरें भ्यों यदा
गोंत्रे षुस्खलितस्तदा भवति च व्रीडाविलश्च-
श्चिरम् ॥६·५॥

चुरमुरी :

ब्यासरदिरूवा बदुकनु सखियनु भोंगिसि जरिदके
बळलि बेंदिरूवा ॥ पल्ला ॥ मनोंहर वस्तुगळनु
ता जरिवा तनुविन सेंवकरनु ब्याडेनुवा ॥ १ ॥
इरूळेल्लनुजागरदोळु कळिवा परियंकदि बल
होरळुतळिरूवा ॥ २ ॥ बळुयच्छर दिदलि माता-
डुवा ललनेयरनु शकुंतले येंदु करिवा ॥ ३ ॥
मोगमुच्छळुवा बिगिदुवस्तरवा नगलु सखियरू
नाचेगे योळुबरूवा ॥ ४ ॥

किर्लोस्कर :

रमणीय वस्तु जरी बघती । बहु कंटाळुनिया-
जाती ॥
नेहमीच्या सेवका हातीं ॥ प्रेमें नच सेवा घेती॥
नच रात्रीं निद्रा येती ॥ शय्येवर तळमळ
करिती ॥ चाल ॥
मंदिरीं कधीं तरी जाती ॥ भलतिलाचि
भलते वदतीं ॥
मुनिकन्या राणिस म्हणती ॥ मगलज्जाण्याकुल
होती ।
किती हाल वदूं भूपाचे ॥ नच खळले अश्रू त्याचे
॥ रमणीय ॥

मूळ संस्कृत पद्यातून हा भाव येत नाही. आपल्याला चुरमुरी आणि किर्लोस्कर यांच्याच पद्यांत हा भाव दिसून येतो. गोडबोले आणि राजवाडे यांनी संस्कृत पद्याचा सरळ अनुवाद केला आहे.

गोंत्रस्खलन = गोंत्रेषु स्खलित
गोंत्र = A Family, race, lineage






स्खलित = Blundering or mistaking in calling by a wrong name.
( Ref. Principal V. S. Apte's Sanskrit, English-Dictionary; Vol. 2; P. N. 672; ed. 1958. )

कन्नड किंवा मराठीत "गोत्रस्खलन" ह्या वाक्याला समानार्थक शब्द नाही. तेव्हा चुरमुरी ह्यांनी "ललनेयरनु शकुंतले येंदु करिवा मोग मुच्चळुवा" असे रूपांतर केले आहे. त्याच धर्तीने किर्लोस्करांनीही "मुनिकन्या राणीस म्हणती मग लज्जा व्याकुळ होती ॥ नच खळले अश्रू त्याचे" असे रूपांतर केले आहे.

संस्कृत :

मनोरथाय नाशंसे किं बाहों स्फंदसे वृथा
पूर्वा वधीरितम् श्रेयों दुःखंहि परिवर्तते (७·१४)

चुरमुरी :

स्फुरण व्यर्थ केळ्भु जवेनिन्नया
शिरियु बंदरंदोदिदे कार्लिनि
बरि दे मॆंण्मनों रथगळॆंके पॆळ्
मरगु मात्र मिक्किहदु जन्मदोळ् ॥

किर्लोस्कर :

मनोरथाची तुटली आशा मग कां स्फुरतो बाहू ॥
पुण्य फलातें टाकुनि दिधलें उरलें दुःखचि साहू ॥

"स्फंदस" ह्या संस्कृत शब्दाचा अर्थ चुरमुरी आणि किर्लोस्कर या दोघांनी 'स्फुरण' असा केला आहे. राजवाडे ह्यांचा मूळ अनुवाद आहे. गोडबोलेंचे विचार आम्हास पाहायला मिळाले नाहीत. त्यात सातवा अंक नव्हता.

मराठी नाट्यमीमांसक डॉ. मधुकर अष्ठीकर यांनी आपल्या "किर्लोस्करी शाकुंतलाची प्रेरणा" (लोकसत्ता– दिनांक ३१-१०-१९८२) लेखात 'अण्णासाहेब किर्लोस्करांनी हे सगळे प्रयोग रंगविण्यासाठी कृष्णशास्त्री राजवाडे ह्यांचे तंत्र आणि मंत्र यशस्वीपणे आत्मसात केल्याचे जाणवते. मग त्यांच्या भाषांतराची प्रेरणा शेषगिरीराव चुरमुरी या कन्नड लेखकाच्या शाकुंतलाच्या कानडी भाषांतरात व्यर्थ का शोधावी ?' असे मत व्यक्त केले आहे. माझा हा लेख वाचून तज्ञांनी निर्णय घ्यावा ही नम्र विनंती.

अकराव्या शतकातील उत्तर कर्नाटकातील रंगभूमीविषयी उपलब्ध असलेल्या 'मुगद' येथील शिलालेखांवरून कळून येते की, कन्नड रंगभूमीची परंपरा फार पुरातन आहे. शिवाय आठव्या शतकात होऊन गेलेल्या कोणा 'नटशेण्य' नावाच्या कलाकाराची नट व नाटककार म्हणून माहिती आढळते. पंधराव्या शतकात अभिजात नाटकांची परंपरा कन्नड साहित्यात अस्तित्वात होती असे दिसून येते.

यक्षगान पद्धतीपासून प्रेरणा प्राप्त करून घेऊन मराठी दशावतार आणि मराठी रंगभूमीची निर्मिती झाली. प्रा. नरहर कुरंदकर आपल्या एका लेखात– 'यक्षगान, अण्णासाहेब किर्लोस्करांचे सौभद्र नाटकातील घटोत्कच'– खालीलप्रमाणे विचार प्रकट करतात.

"यक्षगान प्रयोगातील गणपतीपूजन हा महत्त्वाचा मुद्दा आहे. मराठी लोकपरंपरेत दक्षिणेप्रमाणे गणपतीपूजन आहे. लावणी, तमाशा, वग यांपूर्वी गणगौळण असते. त्यांतील गणात गणपतीचीच स्तुती असते. यक्षगानात असणारे गणपतीपूजेचे महत्त्व हा दक्षिणेच्या लोकपरंपरेचाच भाग आहे, जो पुढे शिष्टमान्य ठरला. महाराष्ट्रातील लोकरंगभूमी गणपतीला महत्त्व देणारी आहे. याचे कारण या लोकरंगभूमीचे उगम दक्षिणेच्या कलापरंपरांशी जोडलेले आहेत. महाराष्ट्रात उत्तरेत उगम असणाऱ्यांचा दक्षिणी आविष्कार होतो. उत्तरेतील वैष्णवांच्या गौळणी दक्षिणेतील गणपतीपूजेसह गणगौळण म्हणून एकत्र येतात. महाराष्ट्राच्या सर्व लोकपरंपरेत हे जे दक्षिण व उत्तरेचे मिश्रण आहे, त्याचे स्वरूप अतिशय संकुल आहे.'

'भरत नाट्यशास्त्रात नाट्यप्रयोगाच्या आरंभी नांदीच्या नंतर सूत्रधार व विदूषक यांचा एक विनोदी असा प्रवेश होत असल्याचा उल्लेख आहे. यक्षगानाच्या आरंभी हनुम–नायक आणि त्याचे साथीदार भागवताबरोबर हास्यविनोद करतात, असा प्रवेश असतो. यक्षगानात गणपतीपूजेनंतर कृष्ण व बलराम या बालगोपालांचा प्रवेश व पाठोपाठ गोपींचा प्रवेश असतोच. यक्षगानाचा हा प्रयोग मोठ्या प्रमाणात गणगौळणींशी मिळताजुळता आहे. आमच्या गणगौळणींवरून यक्षगानाने काही उचल केली असे सुचवायचे नसून महाराष्ट्रातील लोक आणि कर्नाटकातील लोक-कला ह्यांचा संबंध जेवढा वाटतो, त्याहून अधिक निकटचा आहे. यक्षगान पद्धतीच्या लोकनाट्यातील रूपांनी मराठी लोकनाट्याला खूप योगदान केलेले आहे असे मला म्हणायचे आहे.








अनुक्रमणिका

"यक्षगानात राक्षस पात्रालाही खूप महत्त्व आहे. त्या राक्षसाचे नृत्य, त्याच्या डरकाळ्या, मशालीवर राळ टाकून ज्वाला प्रदीप्त करणे, 'चंडे' या वाद्याचे विशिष्ट प्रकारचे वादन ह्या सर्व बाबी महत्त्वाच्या आहेत. किर्लोस्करपूर्व रंगभूमीवर नाटचप्रयोगात राक्षस पात्राचे एक विशिष्ट महत्त्व असे. 'अल्लडूर' नाटके अगर 'तागडथोंब' नाटके म्हणून ज्या नाटकांचा उल्लेख किर्लोस्करपूर्व रंगभूमीचा विचार करताना आपण करतो त्या नाटकांत राक्षसांचे महत्त्व केवळ कथानक पुराणातले आहे किंवा मनोरंजनाला राक्षस उपयोगी पडतात, यांमुळे नाही. यक्षगान-प्रयोगातच राक्षस महत्त्वाचा होता म्हणून किर्लोस्करपूर्व रंगभूमीवरील नाटक, ज्याचा यक्षगान लोकपरंपरेच्या प्रयोग पद्धतीशी निकट अनुबंध आहे, त्यात राक्षस महत्त्वाचा ठरला असे दिसते. म्हणजे राक्षसाचे प्राधान्य प्रेक्षकांच्या अडाणीपणामुळे येत नसून यक्षगान परंपरेमुळे येते असे म्हणावे लागेल.

'मला तर कधी कधी असेही वाटते की, सुभद्रेच्या कथानकात राक्षसाला जागा नसूनही किर्लोस्करांनी घटोत्कच रंगभूमीवर आणला. आपल्या नाटकात एकदा तरी राक्षस आणून नाचवला पाहिजे असे किर्लोस्करांना वाटले. याचे कारण कर्नाटकीय यक्षगान शैलीतील 'सुभद्राहरण' नाटचप्रयोग असावे. कारण त्याही नाटकात एकदा राक्षस आलेलाच असणार.'

ज. स. सुखटणकर यांनी आपल्या 'रूपडचांची रूपकथा' ग्रंथात किर्लोस्करांच्या नाटचलेखनावर 'तंजावरी नाटकांचा प्रभाव' ह्याविषयी व्यक्त केलेले काही विचार योग्य आहेत. त्यांचा सारांश पुढीलप्रमाणे आहे : " अनेकविध सौंदर्याने नटलेले अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे 'सौभद्र' हे मराठीतील पहिले स्वतंत्र संगीत-नाटक असे समजण्यात येते. ते नाटक त्यांच्या 'शाकुंतल' या नाटकाप्रमाणे भाषांतरित नाही. तसे ते पूर्णपणे काल्पनिकही नाही.' नाटकाचे प्रबंध पुष्कळ आहेत. तिकडे जितके देता येईल तितके लक्ष देऊन त्याची रचना केली असल्याचे स्वतः अण्णासाहेबांनीच या आपल्या नाटकाच्या प्रस्तावनेत म्हटलेले आहे. त्यांचे 'सौभद्र' नाटक जन्मास आल्यापासून त्यावर समालोचनात्मक लिखाण उदंड झालेले आहे.

महाभारतातील अर्जुनसुभद्राविवाहाची कथा ही अगदीच साधी आहे. मोरोपंत कवींनी आपल्या 'सुभद्राहरण' या काव्यात या कथेत थोडी रंजकता आणण्याचा प्रयत्न केला आहे. त्यात त्यांनी 'हर्यंतः करण्यासचि–ठावा तद्योग' आणि 'पूजुनि-सु-श्रद्धेने जेवविता माधवास ये हास' या शब्दांनी कृष्णाच्या कपटकारस्थानाची किंचितशी जाणीव दिली आहे. तसेच त्यापुढे बलरामाकडे जेवत असताना सुभद्रेस पाहून अर्जुनाचा झालेला गोंधळ आणि त्याने केलेले भलतेच चाळे, यांचे मोरोपंत 'घाली घृतांत सैंधव, दुग्धी जंबीर, पायसी कथिका' या शब्दांनी वर्णन करतात. अण्णासाहेबांनी हा अर्जुनाचा गोंधळ उघड करताना मोरोपंतांचेच अनुकरण पुढीलप्रमाणे केले आहे–

" घाली सारे मीठ तुपांतची दुग्धी लिंबु पिळीले।
क्षीरीमध्ये कढी घालुनी हस्ताने कालविले ॥ "

अर्जुनसुभद्राविवाहाला नाटचरूप देण्याचे मराठीत जे बरेच प्रयत्न झालेले आहेत, त्यांत तंजावरच्या शाहराजाने लिहिलेल्या " सुभद्रापरिणय " या नाटकाचा क्रम पहिला लागतो. ते एकांकी आहे. कृष्णाच्या कपटकारस्थानाच्या बाबतीत मात्र शाहराजाचे 'सुभद्रापरिणय' आपल्यापुढे ठेवून अण्णासाहेबांनी आपल्या सौभद्रातील तेवढा भाग रचला असावा, असे वाटण्याइतके त्यात साम्य दिसून येते. घरगुती वातावरण उत्पन्न करणारी भाषा आणि कथाप्रवाहास गती देणारी त्यातील पद्यरचना, हे 'सौभद्र' नाटकाचे विशेष गुण म्हणून उल्लेखिले जातात. हे दोन्ही गुण शाहराजाच्या " सुभद्रापरिणया " तूनही प्रत्ययास येतात."

तंजावरचे राजे, चुरमुरी आणि किर्लोस्कर यांनी आपापल्या मातृभाषेत कार्य केले आहे. ते तिघेजण नाटचजगातील दीपस्तंभ आहेत. कर्नाटक आणि महाराष्ट्र यांच्यामधील चालत आलेल्या व भविष्यातही चालू राहणाऱ्या सांस्कृतिक संबंधांची ही मूर्तिमंत प्रतीके आहेत.

एखाद्या नाटककाराच्या नाटचकृतीने प्रभावित होऊन अन्य व्यक्तीने रचिलेल्या कृतीतही त्या व्यक्तीची स्वतंत्र प्रतिभा असते, हे निर्विवाद आहे. तंजावरच्या राजांनी लिहिलेल्या 'सुभद्रापरिणय' किंवा चुरमुरी-भाषांतरित शाकुंतल नाटकाच्या निर्मितीमागील नवकल्पना मराठी रंगभूमीवर क्रांती घडवून आणणाऱ्या आहेत, असे म्हटले म्हणून अण्णासाहेबांच्या विद्वत्तेला आणि स्वतंत्र प्रतिभेला त्यामुळे काहीच बाधा पोचत

नाही. अण्णासाहेब व चुरमुरी ह्यांनी कन्नड आणि मराठी रंगभूमीवरील मधुर परिमलाची देवघेव केली आहे.

उत्तर कर्नाटकात कन्नड भाषेची दुरवस्था १८८५ ते १९१५ पर्यंतच्या काळात आढळून येते. कारण त्या काळात कर्नाटकातून उच्च शिक्षणासाठी पुणे-मुंबईला येणाऱ्या तरुणांवर मराठीचा प्रभाव जास्त होता. नोकरीनिमित्त बदली होऊन कर्नाटकात आलेल्या मराठी-भाषिकांनी आपली कला दाखवायला नवे क्षेत्र म्हणून उत्तर कर्नाटकातील चार जिल्ह्यांत मराठी नाट्यकला-कारांना आमंत्रित केले. याचाच परिणाम म्हणून आधीच मराठी भाषेने प्रभावित झालेल्या कन्नड तरुण पिढीने मातृभाषेकडे पाठ फिरविली. अशा परिस्थितीत सक्करी बाळाचार्य ऊर्फ शांतकवीने कन्नड रंगभूमीच्या विकासा-बाबत केलेले कार्य नुसतेच गौरवास्पद नसून कन्नड रंगभूमीच्या विकासाला ते पोषक ठरले. एवढेच नव्हे, तर शांतकवीचे समकालीन केरूर वासुदेवाचार्य यांनी "खाडिलकरांसारखी नाटके लिहिणे कन्नड पदवीधरांना अशक्य आहे का ?" असे उद्‌गार काढले आहेत.

(कन्नड संगीताच्या चालींचा वापर मराठी नाटक-कारांनी मोठ्या प्रमाणात केला, आणि तेच नाट्यसंगीत कन्नड रंगभूमीवर परत अवतरले. या वेळी कर्नाटकात जावडी शृंगार-गीते, हरिदासांची कीर्तने व नाना तऱ्हांच्या लावण्या लोकप्रिय होत्या. "श्रीकृष्ण पारिजात" व "व्यंकटेश पारिजात" ह्या संगीत लोक-नाटकांतील पदेसुद्धा फार लोकप्रिय होती. तसेच या सुमारास बल्लारीबसप्पादिग्दर्शित हरिश्चंद्र, कीचक-वध नाटकांतील पदेसुद्धा लोकप्रिय होती. मराठी 'स्वयंवर' रंगभूमीवर येण्यापूर्वी अथवा भास्करबुवा बखले मराठी संगीत रंगभूमीचे गुरू म्हणून ओळखले जाण्यापूर्वी मराठी नाटककारांनी कर्नाटकात प्रचलित असलेल्या कर्नाटकी नाटकांतील चालींचा वापर केला होता असे दिसते. त्यानंतर मराठी पोषाख धारण केलेल्या कन्नड चालींचा वापर करण्यास सुरुवात केली.

चुरमुरी आणि शांतकवी हे कन्नड साहित्यात नाटककार म्हणून प्रसिद्ध आहेत. केरूर वासुदेवाचार्य यांनी आधुनिक कन्नड साहित्याला अभिजात नाटक दिले. त्यांच्या नाटकांवर मराठी रंगभूमीचा प्रभाव आढळतो. मराठी नाटककार आपल्या पदावर 'या चालीप्रमाणे' किंवा 'या चालीवर' असे लिहीत असे. असे लिहिण्याची पद्धत ही मूळ कन्नड नाट्यसाहित्याची प्रथा आहे, असा डॉ. शंकर मोकाशी (पुणेकर) यांनी एका लेखात उल्लेख केला आहे.

| लोकप्रिय मराठी नाट्यगीते | चालीसाठी वापरलेली कन्नड गीते |
|---|---|
| नाही कोणीही हुंगिले | इष्टुदिना भू वैकुंठा |
| होतो द्वारका भुवनी | कर्पूर घवलांगा |
| अति कोपयुक्त होय परि सुखविते मला | आसखिय भयदि बेदर ब्याडो |
| नच सुंदरी करू कोपा | बिडोरंगा बिडु हेरळ |
| पांडु नृपति जनक जया | क्षीर सागरा नम्म तवरू मनी |
| निजमुख रक्षाया कौशिक नेई | दयमाड लोल्या दयानिधे |
| सुखचि धन गुणानि सीमा | रंगा बारो नरसिंगा बारो |
| हृया हृया हे कृष्ण मुकुंदा | बेळगाग बंतु बिडेन्न |
| अरसिक किती हा शेला | चिक्कमक्कळे केळिरैय्या |
| भेटा कडकडुनि सखीनो | यातक्केन्ननु येब्बिसी |
| स्वार्थी जी प्रीति मनुजाचे | रंगैय्या मनेगे बारने |
| तो कोठे भूप जाणे | मानिनी मनी नोडु |
| मज गमे ऐसा जनक तो | करे दाळो बारो कामिनी |
| दृष्टी भरे जलभारे | ए सखीये मनेगे बारे |
| घनाने भरले घट तीन | बारो प्रिया ब्यागने |

| | |
|---|---|
| सेवी रविकरा शीत पुष्प | मारिकोळ्ळुवेना |
| चंद्रिका ही जणु | मनुजा सुगुण |
| दे हाता या शरणगता | येराना सामी |
| युवति मना दारूण रणरूचिर | मनसुकरग |
| भाग्यहीन भामिनी खरी | कोमलांग ताळ |
| चुंबुनिया त्यासी हरीन | ह्यांग कळवा |
| किती तरी कोपी जाहले | करेदाळो बारो कामिनी |
| मज समीप किमर्थ आला | बारो प्रिया ब्यागने |
| प्रातःकाली शिखरी रविने तो | कृष्ण निन्न स्मरणे नानू |
| उगीचका कांता | इडु इडु करूणा नारायणा |
| तरूणी सहि सखे नुचिता जना | तरूणिय मातिगे |
| भय हे नवे रूचिले सुदैव | भूसुरोत्तमा भासुरांगी |

| लोकप्रिय कन्नड नाट्यगीते | चालीसाठी वापरलेली मराठी नाट्यगीते |
|---|---|
| शुभवसदा नी हे | अवन करो तुमचे |
| कांता मणी रमणी | बिंबाधरा |
| मू लोकव मोहिसदि हळे | तेथेच उभी की आले |
| बरूतनेने मोहनांग | मधुर किती कुसुमगंध |
| दैववंति येंदु हंसी | मूर्तिमंत भीति उभी |
| प्रेमा कुले नी बरबेके | श्रीमंत पतीची राणी |
| तंदिहिया शुभवार्ते | म्हातारा इतुका न अवघे |
| दयीतेय संश्रयते सुखवे | हरिहर मुग्ध बघूनी करे |
| वळितेनो प्रिया नंबिदे | मज नाही गडे सौख्य |
| इन्नुनळननु मण्णु गाणिपे | कंठ चर चर चिरूनि मारिन |
| भुवनानंदा विवेकांधनी नादिया | मदना चंद्रा सुवैरी |
| प्रखरतर तेजवे चमुकिसु | अधम किती पालका |
| हीगे हीन दशा | कांते फार तुला मजसाठी |
| नीने सर्वेशने कायबेकै | ईश चिंता निवारील सारी |
| येन्तु पोगळळि माधवा | माई सरस्वती शारदा |
| इंदिर ये नरविंद मुखियु | गंध वहा मकरंद |
| दिनकर राज नवोदित नीगले | पुष्पपराग |
| विलासीनि यामिनी तां नाची | प्रिये पहा रात्रीची |
| अंदु पोगुवेना | वाया विफल बोल |
| मरेये केळय्या देवने | मज गमे ऐसा जनक |
| स्मरिसुवे रमा माधवा | धृतांत सुपाधवा |
| बालरे भजीपदुचितवु | स्वार्थी प्रिती मनुजाची |
| बालनें नी पेल्वुदीग | मित्रा मम जन्मकथा |
| कंदने दनु जेंद्रहगेय | हा सकल देह रक्त चंदने |
| सार साक्ष पार महिमे | प्रेम भावे जीव जगीया |
| खळने सततदलि | नच घे उचित प्रिय करणी |

नाटकामध्ये भरपूर पदांचा समावेश करणे हे चुरमुरींचे व किर्लोस्करांचे वैशिष्टय आहे. किर्लोस्करांच्या नाटकांत कर्नाटक पद्धतीच्या चालींनी वैचित्र्य आणले आहे. आपल्या निकट परिसरातल्या चालींचा वापर त्यांनी पदांसाठी केला. साक्या, दिंडचा, लावणी इत्यादींचा वापर "कन्नड शाकुंतला"त (१८७०) पहिल्यांदा केला गेला. खुद्द नाटकातल्या पात्रांनी म्हणावयाची गीते कथानकाच्या विकसनाला अत्यंत उपयुक्त आहेत आणि वेगवेगळचा प्रसंगांना अनुसरून लावलेल्या चालींमुळे नट आपल्या गायनात विविधताही आणू शकतात, हा हेतू या चाली वापरण्यामागे असावा असे वाटते. चुरमुरी आणि किर्लोस्कर यांनी आपापल्या "शाकुंतल" नाटकात कीर्तनातील वृत्ते घेतली, देवादिकांची पदे घातली, तरीपण त्यांनी नाटकाला हरदासी स्वरूप येऊ दिले नाही. रागदारीचा उपयोग केला तरी मैफलीचे स्वरूप येऊ दिले नाही. लावणी वापरूनही तमाशाचा बाज येऊ दिला नाही. कन्नड व मराठी नाटकांचे हे साधर्म्यही मोठे उद्बोधक ठरेल.

चुरमुरींचे "कन्नड शाकुंतल" नाटक १८७० मध्ये प्रसिद्ध झाले असले तरी त्याचा पहिला प्रयोग स्व० श्रीनिवासराव मुगळी यांच्या नेतृत्वाखाली काही हौशी मंडळींनी १८९१ मध्ये विजापूर जिल्ह्यातील बादामी येथे केला.

अण्णासाहेब किर्लोस्कर पुण्याहून परत गुर्लहोसूरला १८६६ मध्ये आले. त्याआधी १८५७ मधील स्वातंत्र्यसंग्रामात नरगुंदचे बाबासाहेब यांनी भाग घेतला होता. त्यात अखेर त्यांना हारही पत्करावी लागली. या घटनेवर आधारलेली काही कन्नड लोकगीते त्या काळी प्रचलित झाली. उत्तर कर्नाटकात "होलेदास" नावाने ओळखले जाणारे बैरागी भिक्षा मागताना दारासमोर येऊन एकतारी वाजवत गातात. त्या काळात नरगुंद येथील उठावावर रचलेल्या 'अळिदार नरगुंद' नावाच्या कन्नड पदाचा हे बैरागी सतत वापर करीत. त्याचा प्रभाव अण्णासाहेबांवर निश्चित पडला असावा. कारण या कन्नड पदाची चाल त्यांनी आपल्या "वीरभद्र अवतार" मधील "दक्षवदे हा देव कशाचा" ह्या पदाला वापरली आहे.

बेळगाव येथील सुंठणकरांच्या वाड्यात कन्नड "श्रीकृष्ण पारिजात" लोकगीत नाटकाचा प्रयोग होत असे. प्रा. ना. सी. फडके म्हणतात, "त्या कन्नड श्रीकृष्ण पारिजात नाटकाच्या धर्तीवर मराठीत नाटक बसवावे म्हणून अण्णासाहेबांनी काही बायका जमवून खटपट सुरू केली. म्हणजे स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनी कराव्यात हे मत आपल्याला वाटते त्यापेक्षा फार जुने आहे. परंतु जमविलेल्या बायका फारच अडाणी असल्यामुळे अण्णांचा तो उद्योग सफल झाला नाही. पुढे हे 'श्रीकृष्ण पारिजातक' नाटक अण्णांनी सांगलीकर नाटक मंडळींस स्वतः बसवून दिले. या नाटकातील बरीच पदे खुद्द नाटकातल्या पात्रांनी म्हणावयाची होती. म्हणजे नाटकात संगीत घालण्याची जी क्रांती अण्णांनी करून दाखविली तिचा प्रारंभ या नाटकानेच त्यांनी करून पाहिला."

"संगीत सौभद्र" नाटकातील 'पांडुनृपति जनकजया' ह्या नाट्यपदाला "क्षीर सागर नम्म तवरमनी द्वारके नम्मत्ती मनी, देवकी येन्ना असे, वसुदेव येन्ना मावनव्वा" ह्या कन्नड पदाची चाल लावली आहे. ह्या कन्नड पदाचे कर्ते कुलगोड तम्मण्णा हे आहेत. त्यांनी मूळ कन्नड "श्रीकृष्ण पारिजात" लोकगीत नाटकासाठी आपल्या स्वतंत्र प्रतिभेच्या साहाय्याने जी अनेक पदे रचली, त्यांपैकी हे एक पद आहे. 'पूर्वरंग श्रीकृष्ण पारिजात' नावाने ओळखली जाणारी त्यांची पदे कर्नाटक आणि महाराष्ट्रात न भूतो न भविष्यती अशी लोकप्रिय झाली आहेत.

गेल्या शतकात बेळगावच्या परिसरातील वीरशैव मठात लहान मुलांना शिकविल्या गेलेल्या "चिक्कमक्कळे केळिरो" ह्या कन्नड पदाची चाल "अरसिक किती हा शेला" या नाट्यपदासाठी वापरली गेली आहे. अजूनही बेळगाव आणि धारवाड जिल्ह्यांतील काही जुनी मंडळी फारच सुरेख आवाजात हे पद म्हणताना मी ऐकले आहे.

चुरमुरी ह्यांचे चुलते कृष्णराव चुरमुरी हे गेल्या शतकातील एक सुप्रसिद्ध वकील आणि मोठे रसिक कवी होते. कन्नड भाषेतील "बेळगाग बंतु बिडेन्ना, नाळे तडेयदे बरूवेनु केलो मोहन्ना" या रंगेल पदाचे ते रचयिते. हे पद कर्नाटकातील वेश्या नृत्य करीत आणि हाव-भाव व्यक्त करून म्हणत असत. अण्णासाहेबांनी बसवून दिलेल्या "श्रीकृष्ण पारिजातक" या नाटकातील गीतावर ह्या पदाचा प्रभाव दिसून येतो. 'कन्नड शाकुंतल'कार चुरमुरी यांनीही








आपल्या नाटकात ही चाल वापरली आहे. शिवाय "बेदर ब्याडो मदन सुंदरा" आणि "दयमाड लोल्या दयानिधे" या दोन प्रसिद्ध कन्नड पदांच्या चाली कन्नड शाकुंतल नाटकात चुरमुरी ह्यांनी वापरल्या आहेत. अण्णासाहेबांवर या दोन पदांनी चांगली मोहिनी घातली असावी. "संगीत सौभद्र" आणि "रामराज्य-वियोग" या नाटकात त्यांनी या दोन पदांच्या चाली वापरल्या आहेत.

वरील विवेचनावरून असा निष्कर्ष निघतो की, किर्लोस्करांच्या नाट्यगीतांत वापरल्या गेलेल्या प्रसिद्ध कन्नड चाली बेळगाव आणि धारवाड जिल्ह्यांत त्या काळात प्रचलित होत्या. ह्याच सुमारास धारवाड येथील ट्रेनिंग कॉलेजचे उप-प्राचार्य श्रीनिवास रामचंद्र सवदी यांनी कन्नड "श्रीकृष्ण पारिजात" लोकगीत नाटकाला मराठी भाषेत प्रस्तावना लिहिली. शिवाय कन्नड लिपी न जाणणाऱ्या मराठी वाचकांना सुलभ व्हावे या हेतूने "श्रीकृष्ण पारिजात" नाटक देवनागरी लिपीत प्रकाशित केले. आबाजी रामचंद्र सामंत यांच्या छापखान्यातून कित्येक कन्नड हरदासांची भक्तिगीते मराठी भाषेत देवनागरीत प्रसिद्ध झालेली आहेत.

कन्नड संगीताच्या चालींचा वापर अगोदर मराठी नाटककार अण्णासाहेब किर्लोस्कर यांनी आपल्या "संगीत शाकुंतल", "सौभद्र", "रामराज्यवियोग" इत्यादी नाटकांत; गोविंद बल्लाळ देवल यांनी आपल्या "विक्रमोर्वशीय", "शारदा" या नाटकांत; कोल्हटकरांनी "मूकनायक", "मतिविकार", "गुप्त-मंजूष" या नाटकांत व खाडिलकरांनी "मानाप-मान" या नाटकात केला आहे. तीच मराठी नाट्यपदे चाल म्हणून कन्नड रंगभूमीवर पुन्हा अवतरली आहेत. वामनराव सवणूर मास्तर यांनी आपल्या "कन्नड संतसखु" नाटकात 'सकल जगद धर्मात्मक' ह्या नाट्यपदाला "झाले युवती मना" या मराठी नाट्य-गीताची चाल लावली आहे. "कन्नड महानंदा" नाटकात 'रन्नदामूर्तियो कांतियो' या नाट्यगीताला "चंद्रिका ही जणु"ची चाल लावली.

मराठी व कन्नड नाट्यसाहित्य व रंगभूमीवरील देवाण-घेवाण दोन्ही भाषांतील साहित्याला भूषणावह आहे.

## ग्रंथसूची


१. विविध ज्ञानविस्तार : १८६७–१८६८.
२. कृ. बा. मराठे : मराठी रंगभूमीचा पूर्वरंग.
३. स्व. य. ग. लेले आणि घारपुरे : समग्र किर्लोस्कर.
४. प्रो. ना. सी. फडके : किर्लोस्कर, देवल, गडकरी यांच्या नाट्यकृतींचे सविस्तर मूल्यमापन आणि रसग्रहण.
५. ज. स. सुखटणकर : रूपड्यांची रूपकथा.
६. माया सरदेसाई : मराठी रंगभूमीचा उषःकाल.
७. तारा भवाळकर : यक्षगान आणि मराठी नाट्यपरंपरा.
८. डॉ. निर्मला गोगटे : मराठी-गुजराथी कन्नड रंगभूमीचा परस्परसंगीतिक संबंध.
९. मधुकर अष्टीकर : किर्लोस्करी शाकुंतलाची प्रेरणा; लोकसत्ता दि. ३१–१०–१९८२.
१०. शाकुंतल (नाटक) (अनुवाद) : कृष्णाशास्त्री राजवाडे.
११. शाकुंतल (नाटक) (अनुवाद) : परशुरामपंत गोडबोले.
१२. शाकुंतल (नाटक) (अनुवाद) : गणपत कृष्ण गुंजीकर.
१३. शाकुंतल (नाटक) (अनुवाद) : अण्णासाहेब किर्लोस्कर.
१४. गोविंद बल्लाळ देवल : विक्रमोर्वशीय (नाटक).
१५. गोविंद बल्लाळ देवल : शारदा ( नाटक )
१६. श्री. कृ. कोल्हटकर : मूकनायक.

१७ श्री. कृ. कोल्हटकर : **मतिविकार.**
१८. श्री. कृ. कोल्हटकर : **गुप्तमंजूष.**
१९. कृ. प्र. खाडिलकर : **मानापमान.**
20. *Marathi theatre*; Popular Prakashan.
21. *Karanatak theatre*; Dr. H. K. Ranganath.
22. Ed. Prin. V. S. Apte : *Sanskrit-English Dictionary.*
23. S. Kanavalli : *What Dharwar given Hindustani Music*; Times of India 16-5-87.
24. Tr. S. R. Churmuri : *Shakuntala (Drama).*
25. Ed. R. G. Kulkarni : *Krishna Parijat.*
26. Ed. Prof. K. D. Kurthkoti and G. B. Joshi : *Vasudeva Prashasthi.*
27. Kerur Vasudevacharya : *Nala Damayanti (Drama).*
28. Kerur Vasudevacharya : *Pralhad (Drama- incomplete).*
29. *Sant Sakhu* (Kannada Translation).
30. *Mahananda* (Kannada Translation).
31. *Sachitra Bharat* (Monthly)- 1916; ed Kerur Vasudevacharya.

* *










अनुक्रमणिका

## हरिभाऊ मोटे विज्ञान पारितोषिक (१९९१)

कै. हरिभाऊ मोटे हे मराठी साहित्य विश्वातील एक चोखंदळ प्रकाशक आणि साहित्यिक होते, हे मराठी वाचकांस ठाऊक आहे. कै. हरिभाऊंच्या नावाने त्यांचे अमेरिकेत स्थायिक असलेले चिरंजीव डॉ. शरद मोटे आणि पत्नी श्रीमती कृष्णाबाई मोटे यांनी १९८५ साली मराठी विज्ञान परिषदेकडे रु. २५,०००/– सुपूर्द केले. या रकमेच्या व्याजातून दरवर्षी २ ऑक्टोबरला येणाऱ्या कै. हरिभाऊंच्या जन्मदिनी "मराठी विज्ञान परिषदेचे हरिभाऊ मोटे विज्ञान पारितोषिक" दिले जाते. एक वर्षी उत्कृष्ट बाल विज्ञान वाङ्मयास तर पुढील वर्षी उत्कृष्ट विज्ञान शिक्षण-साधनास रु. २०००/– चे पारितोषिक दिले जाते.

१९९१ साली हे पारितोषिक उत्कृष्ट विज्ञान शिक्षण-साधनास दिले जाणार आहे. निरनिराळ्या स्तरांवरील विद्यार्थ्यांसाठी बनविलेली शैक्षणिक साधने, प्रयोग-पेटचा, अन्न-भेसळ, पाणी-प्रदूषण वगैरे ओळखण्यासाठी संच किंवा समाजाला उपयुक्त ठरणारी विज्ञान प्रसार साधने यात येऊ शकतील. १ एप्रिल १९८९ ते ३१ मार्च १९९१ या काळात तयार केलेली साधने इच्छुकांनी १ ऑगस्ट १९९१ पर्यंत मराठी विज्ञान परिषदेत आणून द्यावीत. स्पर्धेसाठी आलेली साधने परिषदेकडेच राहतील.

खालील नमुना अर्जात दिल्याप्रमाणे आपल्या साधनाची माहिती पाठवावी.

१. विज्ञान शिक्षण-साधनाचे नाव–

२. वयोगट (साधन नेमके कोणासाठी ? )–

३. कोणते तत्त्व स्पष्ट केले जाते ? किंवा काय शिकवण्यासाठी हे साधन तयार केले ?

४. आकृती/आकृत्या–

५. साधन कसे वापरावे ?

६. बाजारातील नेहमीच्या उपकरणापेक्षा हे उपकरण चांगले कसे ?

७. उपकरणाची विक्रीची किंमत रु. .........

८. स्पर्धकाचे नाव, पूर्ण पत्ता व स्पर्धकाचा व्यवसाय–

सही

(अर्ज स्वतंत्र कागदावर एकाच बाजूस लिहावा.)





अनुक्रमणिका

# अक्षरवेध

**पाश्चात्त्य साहित्यशास्त्र : सिद्धान्त आणि संकल्पना** – प्रा. डॉ. सुरेश धायगुडे; निर्भय प्रकाशन, पुणे; १९९०; पृ. ३ + २४६; किंमत ८० रु.

आधुनिक मराठी साहित्य व समीक्षा यांच्यावर पाश्चात्त्य परंपरेचा मोठा प्रभाव पडलेला असल्याने या परंपरेची आपल्याला नीट माहिती असावी असे मराठीच्या अभ्यासकास वाटणे स्वाभाविक आहे. यासाठी तो साहजिकच इंग्रजी साहित्य व समीक्षा यांच्या अभ्यासकाकडे वळतो. इंग्रजीसाठी बी. ए. व एम. ए. या परीक्षांसाठी जो अभ्यासक्रम नेमलेला असतो त्यात पाश्चात्त्य साहित्यशास्त्र व समीक्षा यांचा बहुतेक विद्यापीठांनी समावेश केलेला आहे. प्रा. धायगुडे मराठीभाषिक आहेत, इंग्रजी व संस्कृत या दोन विषयात त्यांनी एम. ए. ही पदवी मिळविली आहे, पाश्चात्त्य व भारतीय काव्यशास्त्राचा तौलनिक अभ्यास करून पीएच. डी. ही पदवी संपादन केली आहे. मराठीच्या पदव्युत्तर विद्यार्थ्यांची गरज लक्षात घेऊन आपण प्रस्तुत पुस्तक लिहिले आहे, अनेक साहित्य-सिद्धान्तांमागील तात्त्विक पार्श्वभूमी स्पष्ट करून सांगितली आहे. या सिद्धान्ताचा मूळ ग्रंथावरून परिचय करून दिला आहे, इत्यादी माहिती स्वत: लेखकाने प्रस्तावनेत दिली आहे. या आश्वासक माहितीमुळे ज्याची भिस्त केवळ मराठीत उपलब्ध असलेल्या लेखनावर आहे असा वाचक मोठ्या अपेक्षा बाळगून प्रस्तुत पुस्तकाकडे वळणे स्वाभाविक आहे. ते वाचल्या-मुळे अशा वाचकाच्या पदरात नक्की काय पडणार आहे व ते किती कसाचे आहे, हे आपण येथे पाहणार आहोत.

पाश्चात्त्य साहित्यशास्त्राला दोन हजार वर्षांचा अखंडित असा इतिहास आहे. अडिचशे पृष्ठांच्या पुस्तकात इतक्या मोठ्या परंपरेची व्यवस्थित माहिती देताना या परंपरेतील कोणते लेखक महत्त्वाचे, कोणाला चिरंतन स्वरूपाचे महत्त्व असून कोणाला केवळ ऐतिहासिक महत्त्व आहे, हे ठरविणे आवश्यक ठरते. पृष्ठांची वाटणी महत्त्वपूर्णतेच्या निकषानुसार करायला हवी. ही प्राथमिक जबाबदारी लेखकाने कितपत व्यवस्थितपणे, जाणतेपणाने पार पाडली आहे, हे पाहायला हवे. त्याने कांटला तीन पाने तर एम्पसनला चार, रिचर्ड्‌सला सहा, एलियटला आठ, सिडनीला आठ, ड्रायडनला बारा पाने दिली आहेत आणि लेविस, ए. सी. ब्रॅडली, प्लेखानॉव्ह, ल्युकाच यांना पूर्णपणे फाटा दिला आहे. क्रोचेला जाणीवपूर्वक वगळले आहे. ॲरिस्टॉटलला एकोणीस पाने दिली हे योग्य झाले. पण इतर पृष्ठविभागणीत कसलेच न्याय्य तत्त्व पाळल्याचे दिसत नाही. ज्याला पाश्चात्त्य साहित्यशास्त्राच्या परंपरेची नीट माहिती आहे त्याला ही विभागणी फारच चमत्कारिक व मनमानी वाटेल. लेविस, ब्रॅडली व सार्त्र यांना पूर्णपणे का वगळले हे जसे त्याला कळणार नाही तसे सिडनी व ड्रायडन यांना इतकी ऐसपैस जागा का दिली हेही कळणार नाही.

महत्त्वपूर्णतेचा निकष न वापरल्याने ब्याच ठिकाणची माहिती अपुरी व जुजबी वाटते. यासाठी एक-दोन उदाहरणे पाहू. पृ. १८८-९० वर Tradition and the Individual Talent या एलियटच्या गाजलेल्या निबंधाची ओळख करून देण्यात आली आहे. ही माहिती चिकित्सक दृष्टीने न दिल्याने ती वरवरची अशी झालेली आहे. ती अपुरीही आहे; कारण ती काव्यातील व्यक्तिनिरपेक्षतेविषयी असून परंपरा या महत्त्वाच्या व कठीण विषयाबद्दल तिच्यात काहीही नाही. बव्हंशी साहित्येतर कलेविषयी असलेल्या द रेनेसान्स या पुस्तकावरून वॉल्टर पेटरविषयी माहिती दिली असून प्रामुख्याने साहित्यावर असलेल्या त्याच्या ॲप्रिसिएशन्स या पुस्तकाला वगळले आहे (पृ. १६९ ते ७१). हे अगदी अन्याय्य आहे. वरील उदाहरणांच्या मानाने रिचर्ड्‌सचा सिद्धान्त बरा मांडलेला आहे. ही माहिती पदव्युत्तर अभ्यासकांसाठी दिलेली असेल तर तिच्यात चिकित्सा व मूल्यमापन हे घटक असणे आवश्यक








ठरते; मूळ लेखनाचा तर्जुमा देऊन चालत नाही. परंतु तर्जुम्यापलीकडे जाऊन सखोल चिकित्सा, विश्लेषण, मूल्यमापन करण्याचा प्रयत्न प्रस्तुत पुस्तकात जवळ जवळ कोठेच सापडत नाही. रिचर्ड्‌सच्या सिद्धान्ताची दोन अंगांनी चर्चा होणे अगत्याचे आहे. रिचर्ड्‌सचा उपयुक्ततावादी मूल्यविचार जीवनात व साहित्यात स्वीकारणीय आहे का ? तो तसा असेल, तर महात्मा गांधींसारख्यांचे जीवन मूल्यहीन मानायचे का ? या मूल्यविचाराप्रमाणे बहुतेक रोमँटिक काव्य मूल्यहीन मानावे लागेल; हे मूल्यमापन स्वीकारायचे का ? काव्य, साहित्य हे वास्तवाचे ज्ञान देत नाही, हे रिचर्ड्‌सचे म्हणणे ग्राह्य मानले, तर ॲरिस्टॉटलपासून आजपर्यंतच्या अनेक कलामीमांसकांचे सिद्धान्त बाजूला सारावे लागतील; ते तसे सारायचे का ? जरूर वाटल्यास विचारवंताने तेही करावे; पण योग्य ती चर्चा, चिकित्सा, युक्तिवाद हे सर्व झाल्यानंतरच रिचर्ड्‌सचा स्वीकार करायचा की अव्हेर करायचे हे ठरविणे रास्त आहे. पण पुस्तकात अशी चिकित्सा, चर्चा जवळजवळ कोठेही नाही. सिडनी व ड्रायडन यांच्यावरील विस्तृत मजकुरातही ती नाही. रिचर्ड्‌सच्या मूल्यसिद्धान्तामागे उभ्या असलेल्या उपयुक्ततावादाची माहिती प्रा. धायगुडे यांनी येथे दिली असती तर उल्लेखिलेल्या मुद्द्यांपैकी काही मुद्दे वाचकांस स्वाभाविकपणे सुचले असते. अशी माहिती पुरविण्याची लेखकाची प्रतिज्ञा असली तरी येथे तिचा लेखकाला विसर पडलेला दिसतो.

वरील उदाहरण अपवादात्मक नाही हे चिकित्सक वाचकाच्या लौकरच ध्यानात येते. कोलरिजने आपल्या **बायोग्राफिया लिटरारियामध्ये** Primary, secondary imagination, Fancy यांच्याविषयी जो सिद्धान्त मांडलेला आहे त्यावरील प्रस्तुत पुस्तकातील माहिती वाचावी, आणि कोलरिजचा सिद्धान्त समजण्यासाठी या माहितीचा कितपत उपयोग होतो हे सूज्ञ वाचकाने स्वतःच ठरवावे. अर्थात, ज्याची इंग्रजी भाषेवर व पाश्चात्त्य साहित्यशास्त्रीय सिद्धान्तावर चांगली पकड आहे तोच वाचक हे काम करू शकेल. ज्याच्याकडे ही पूर्वतयारी नाही तो वाचक प्रस्तुत पुस्तकातील तर्जुमावजा मजकूर निमूटपणे स्वीकारील, तिचा परीक्षेत उपयोग करील, त्याला चांगले गुणही मिळतील, तो महाविद्यालयात अगर विद्यापीठात शिक्षकही बनेल ... या सर्वांत मोठा धोका आहे.

जे इंग्रजीत उपलब्ध आहे त्याच्या संदर्भात प्रस्तुत पुस्तकाची ही अवस्था आहे. ज्याच्यासाठी इंग्रजी भाषांतरांवर अवलंबून राहावे लागते, आणि जे तत्त्वज्ञानातील पूर्वतयारीशिवाय कळत नाही त्याच्या संदर्भात प्रस्तुत पुस्तकाने काय साधले असेल, हे अजमावण्यासाठी एक-दोन उदाहरणांचा विचार करू. प्रा. धायगुडे यांनी ॲरिस्टॉटलच्या **पोएटिक्समधील** पुढील अवतरण दिले आहे : ‘ The poet's function is to describe not the thing that has happened, but the kind of thing that might happen, i. e. What is possible as being probable or necessary.’ यावर प्रा. धायगुडे लिहितात, ‘ जे प्रत्यक्षात घडले आहे त्याचे वर्णन करणे हे कवीचे काम नाही. जे संभवनीय वा शक्यतेच्या कोटीतील म्हणून घडू शकेल त्या प्रकारच्या गोष्टीचे वर्णन करणे हे कवीचे काम आहे ’ (पृ. ३२). मुळातील इंग्रजी अवतरणात possibility, probability, necessity या तीन संकल्पना आलेल्या आहेत. त्यांपैकी दुसरी व तिसरी या संकल्पना विशेष महत्त्वाच्या असून ॲरिस्टॉटलने **पोएटिक्समध्ये** इतरत्रही त्यांच्यावर भर दिला आहे. काव्य व ज्ञान यांच्यातील संबंधाविषयी ॲरिस्टॉटलने घेतलेली भूमिका ज्यांना परिचित आहे त्यांना **पोएटिक्समध्ये** वरील संकल्पनांना का महत्त्व मिळाले असावे, हे सहज समजेल. प्रा. धायगुडे यांनी Necessity च्या संकल्पनेला पूर्णपणे डावलले आहे. Probability ची दोन स्पष्टीकरणे उपलब्ध आहेत; त्यांची चर्चा लेखकाने अजिबात केलेली नाही, ती करणे फार आवश्यक होते.

आता आणखी एक नमुना पाहा. पृ. २२ वर प्रा. धायगुडे लिहितात : ‘ खरे ज्ञान हे विशिष्ट वस्तूच्या संवेदनेपलीकडे, तिच्या आभासापलीकडे व आपल्या तिच्याविषयीच्या मतांच्या पलीकडे असते. त्यांमध्ये एखादा अनुभव ह्या तर्कशुद्ध विश्लेषणाने बांधलेला असतो. उदाहरणार्थ, ‘ सिमियस सॉक्रेटिसपेक्षा उंच आहे ’ हे एखाद्याचे प्रामाणिक मत असू शकेल. पण ते ज्ञान नाही. कारण सिमियस सिमियस आहे म्हणून तो सॉक्रेटिसपेक्षा उंच आहे असे म्हणता येत नाही, ( ‘ उंचपणा ’ हा गुण आहे, ‘ सिमियस ’ हा गुण नाही हे येथे लक्षात घेतले पाहिजे. ) पण ‘ सिमियस सॉक्रेटिसपेक्षा उंच असला तरी फीडोपेक्षा बुटका आहे ’




हे मात्र ज्ञान आहे कारण यात खरे मत हे तर्कशुद्ध विश्लेषणाने बांधलेले आहे. वरील उदाहरणात 'उंच' व 'बुटका' या परस्परसापेक्ष संज्ञा असून त्यांच्या आधारावर विशिष्ट व्यक्तींचे परस्परसापेक्ष वर्णन करता येते; हे ज्ञान आहे.' वारंवार वाचूनही प्रा. धायगुडे यांच्या वरील वाक्यांचा अर्थ कळत नाही. वाचकाची मर्यादित आकलनशक्ती याला जबाबदार आहे असे म्हणता येत नाही. ही वाक्येच गोंधळाची आहेत. येथे एक शक्यता नोंदवून ठेवतो. वरील वाक्ये एखाद्या इंग्रजी उताऱ्याच्या तर्जुम्याच्या स्वरूपाची वाटतात. तर्जुमा नीट झालेला नसल्याने किंवा मूळ उताऱ्यातले काही महत्त्वाचे संदर्भ अनवधानाने तर्जुम्यातून गळाले असल्याने वरील वाक्ये अनाकलनीय झाली असावीत.

क्रोचे व कांट हे प्रा. धायगुडे यांचे खास नावडीचे लेखक असावेत. त्यांनी क्रोचेला जाणीवपूर्वक गाळले आहे; ते प्रास्ताविकात लिहितात, 'प्रस्तुत ग्रंथाचा भर साहित्यावर असल्याने निव्वळ तत्त्वज्ञानात्मक किंवा अमूर्त सौंदर्यशास्त्रीय मतांचा विचार येथे टाळण्यात आला आहे. क्रोचेची सौंदर्यमीमांसा या ग्रंथात का समाविष्ट करण्यात आली नाही याचे उत्तर यातून मिळेल अशी आशा आहे.' ज्याने क्रोचेचे इस्थेटिक वाचले आहे त्याला वरील स्पष्टीकरण मुळीच पटणार नाही. ज्याला साहित्यात गोडी आहे त्याला जिव्हाळ्याचे वाटतील अशा कितीतरी प्रश्नांची चर्चा क्रोचेच्या पुस्तकात सापडते.

लेखकाने मोठ्या उदारपणे कांटवर तीन पाने खर्ची घातली आहेत. पण ती नुसतीच खर्ची पडली आहेत असे म्हणावे लागते. कला व साहित्य यांच्या आधुनिक मीमांसेतील स्वायत्ततावादाची गंगोत्री कांटमध्ये सापडते. त्यामुळे त्याला पाश्चात्त्य परंपरेत फार महत्त्वाचे स्थान आहे. पण प्राध्यापक धायगुडे यांच्या पुस्तकात कांटकडे अक्षम्य असे दुर्लक्ष झाले आहे. हे अज्ञानाचे लक्षण मानायचे की चुकीच्या पूर्वग्रहांचे ?

पृ. १३४ वर लेखकाने कांटविषयी जे लिहिले आहे ते वाचून चुकीच्या पूर्वग्रहांना उगीच दोष देण्यात अर्थ नाही हे लक्षात येते. '...कांटला हे तीव्रपणे जाणवले व तो प्रत्ययवादाच्या "तात्त्विक निद्रेतून" (dogmatic slumber मधून) खडबडून जागा झाला. त्याने ब्रिटिश प्रत्ययवादाच्या मूळ प्रमेयालाच आव्हान दिले व त्यामुळे तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात... क्रांती घडून आली.' 'Dogmatic slumber' हे शब्द '*Prolegomena to Every Future Metaphysics......*' या कांटच्या पुस्तकातील आहेत. कांट म्हणतो, 'I readily confess that the reminder (challenge) of David Hume was what first interrupted my dogmatic slumber many years ago and gave my research in the field of speculative philosophy quite a different direction.' या वाक्याच्या आजूबाजूचा मजकूर वाचला, आणि कांटची ह्यूम वाचायच्या आधीची व नंतरची भूमिका यांबद्दलचे तज्ज्ञांचे मत विचारात घेतले, की प्रा. धायगुडे कोणताही पुरावा न देता व कसलाही युक्तिवाद न करता जगावेगळी चुकीची मते मांडत आहेत असे लक्षात येते. कांटचे सौंदर्य व कला यांबद्दलचे विचार महत्त्वाचे व कठीण आहेत. वाचकाला येथे मार्गदर्शनाची फार गरज भासते. याबाबतीत प्रा. धायगुडे यांनी काय केले आहे ते पाहू.

कांटच्याच संदर्भात प्रा. धायगुडे पुढे लिहितात, 'कलानुभवातून मिळणारे ज्ञान कधीच संकल्पनात्मक नसते. पण तरीही त्याच्या ठिकाणी सर्वमान्य ग्राह्यता असते. ही ग्राह्यता कलानुभव घेणाऱ्या व्यक्तीच्या आंतरिक प्रत्ययावर आधारलेली अर्थात आत्मनिष्ठ असते. (Art has universal subjective validity as against the universal objective validity of science. Aesthetic experience is not a conceptual judgement, but it has universal assent)' (पृ. १३५ ते ३६). वरील उताऱ्यातील केवळ शेवटच्या इंग्रजी वाक्याचा तोंडवळा कांटच्या लिखाणाशी मिळताजुळता आहे. इतर वाक्ये कांटवर आधारल्यासारखी वाटत नाहीत. अभिरुचीच्या विधानाला– त्यात संकल्पना नसतानासुद्धा सर्वमान्यता असते. सौंदर्यात्मक घटितामुळे जो आनंद मिळतो तो– त्यात संकल्पना नसतानाही– सार्वत्रिक असतो, ही कांटची भूमिका सर्वांच्या परिचयाची आहे. या वाक्याखेरीज वरच्या इतर वाक्यांचे काय करायचे ? कलानुभवातून ज्ञान मिळते, असे कांट कोठे म्हणतो ? तो तसे म्हणतच नसेल तर हे ज्ञान संकल्पनात्मक असण्या-नसण्याबाबतचा प्रश्न कसा उपस्थित होतो ?







अनुक्रमणिका

कलानुभव घेणाऱ्या व्यक्तीचा आंतरिक प्रत्यय म्हणजे काय ? याबद्दल कांटने कोठे व निश्चित काय म्हटले आहे ? ... वरील अवतरणाजवळच्या टिपेत प्रा. धायगुडे लिहितात, अधिक 'तपशिलासाठी पहा– Kant's Critique of Pure Judgement... p.p. 46–70. यावर दोन आक्षेप घ्यायला हवेत. (अ) कांटने Critique of Pure Judgement या नावाचे पुस्तक खरोखरच लिहिले आहे का ? की येथे Critique of Pure Reason व Critique of Judgement या दोन नावांच्या संकरातून हे नवे नाव तयार होऊन त्याचे पितृत्व कांटवर लादले गेले आहे ? (येथे जाता जाता एक शंका व्यक्त करावीशी वाटते. याच प्रकरणातील ३९ व्या टिपेतील जेम्स सदरलँडच्या पुस्तकाचे नाव प्रा. धायगुडे यांनी दिल्याप्रमाणे A Preface to Eighteenth Century असे आहे, की A Preface to Eighteenth Century Poetry असे आहे ? (आ) संदर्भात नेमकेपणा असला तरच तो उपयुक्त ठरतो. प्रा. धायगुडे यांनी वर दिलेल्या संदर्भात नेमकेपणा अजिबात नाही. कांटसारख्यांच्या पुस्तकातील पृ. ४६ ते ७० असा संदर्भ देणे म्हणजे खऱ्या अर्थाने संदर्भ न देणे होय.

प्रा. धायगुडे पुढे लिहितात, 'आपल्या संपूर्ण कलामीमांसेत कांटने आंतरिक जाणीव (intuition) या घटकावर भर दिला आहे. या अंतर्ज्ञानाच्या मार्गानेदेखील व्यक्ती सत्य समजावून घेऊ शकते.' (पृ.१३६) कांटचे म्हणून वर दिलेले मत इतके जगावेगळे आहे, की ते कांटच्या पारंगत अभ्यासकांनादेखील पूर्णपणे अनोळखी वाटेल. खरे म्हणजे प्रा. धायगुडे यांनी यावर एक स्वतंत्र, विद्वत्तापूर्ण शोधनिबंध लिहिणे जरूर आहे.

वरील चर्चेनंतर काही प्रश्न मनात निर्माण होणे स्वाभाविक आहे. मराठीच्या पदव्युत्तर विद्यार्थ्यांची नक्की कोणती गरज लक्षात घेऊन प्रा. धायगुडे यांनी प्रस्तुत पुस्तक लिहिले ? कोणत्या साहित्य सिद्धान्तामागील तात्त्विक पार्श्वभूमी स्पष्ट करून सांगितली ? या सिद्धान्ताचा कोणत्या मूळ ग्रंथांवरून परिचय करून दिला ? प्रस्तावनेत लेखकाने पुस्तकाविषयी केलेला दावा थोडातरी टिकण्यासारखा आहे का ? तो टिकण्यासारखा नसेल, तर हे पुस्तक कोणाच्या उपयोगी पडण्यासारखे आहे ? ज्याला इंग्रजी चांगले येते व मूळ विषय नीट समजला आहे, त्याला पुस्तकाचा काहीही उपयोग नाही. इंग्रजी भाषेवर व प्रस्तुत विषयावर ज्याची पकड पक्की नाही अशा वाचकाची पुस्तकामुळे अनेक जागी दिशाभूल होण्याची शक्यता आहे. पहिल्या प्रकारचा वाचक या पुस्तकाकडे वळण्याची शक्यता फार कमी आहे. दुसऱ्या प्रकारच्या वाचकाने हे पुस्तक स्वतःच्या जोखमीवर वाचावे असा इशारा द्यायला हवा.

**–रा. भा. पाटणकर**

---

**'आहे मनोहर तरी'** : सुनीता देशपांडे; मौज प्रकाशन गृह; खटाववाडी, गिरगाव, मुंबई ४; प्रथमावृत्ती; जून १९९०; पृष्ठे २३२; मूल्य १०० रुपये.

---

'आहे मनोहर तरी'मधील सुनीताबाई देशपांडे यांची आठवणींच्या प्रदेशातली पाखरांसारखी स्वैर भटकंती हे गद्यात लिहिलेले मोठे प्रसन्न नि प्रदीर्घ असे सुंदर जीवनगाणे आहे. एखाद्या उत्तम गाण्यात काव्य, तत्त्वज्ञान व कारुण्य इ. चा प्रौढ नि प्रत्ययकारी आविष्कार असतो. प्रत्यही आत आत पाझरत जाणारी अद्‌भुतरम्य लय असते. सुनीताबाईंच्या या आत्मसंवादातही (आत्मचरित्र, आत्मकथन इ. रूढ संज्ञांपेक्षा प्रस्तुत लेखनासाठी हा शब्द विशेष अर्थवाही ठरावा.) त्यांना लाभलेले लौकिक जीवन, त्याचा एक प्रभावशाली कलात्मक पट आणि त्या पार्श्वभूमीवर एका मनस्विनीचे विलक्षण पारदर्शक चिंतनशील असे बहुआयामी काव्यात्म भाष्य प्रकटले आहे. गीत-संगीतातील सुरांप्रमाणे चिंतन-विचारादींच्या तर्कशुद्ध तानाही कलंदरपणे घेता येऊ शकतात आणि त्याचा प्रभाव-परिणामसुद्धा तितकाच हृदयस्पर्शी असू शकतो; याचा एक विशेष प्रत्यय या लेखनामध्ये येतो.

पु.लं.सारख्या सदैव वाजत-गाजत राहिलेल्या लोकप्रिय लेखक-कलावंताच्या सघन सावलीतही स्वतःसाठी काही स्वतंत्र अशी जीवनदायी किरणे मिळवून सुनीताबाईंनी आपले म्हणून एक वेगळे, बाणेदार आणि स्वाभिमानी व्यक्तिमत्त्व प्रयत्नपूर्वक घडविले आहे. सामान्यपणे कोणत्याही लोकशरण कलावंतपणाच्या लौकिक झगमगाटामध्ये जवळची माणसे एरवी रंगहीन आणि दुय्यम ठरतात. सुनीताबाईंचे तसे होत

अनुक्रमणिका

नाही. त्यांच्यापाशी आपल्या व्यक्तिमत्त्वाचा सुघडसा मनःपूत अलंकार सहजपणे साकारण्याएवढे पिंडप्राप्त अभिजात सोने आहे आणि अंगभूत कौशल्यदेखील. म्हणूनच आत्मसंवाद साधणाऱ्या या काव्यपूर्ण वंदिशीकडे केवळ एका प्रसिद्ध पुरुषाच्या पत्नीचे किंवा एका स्त्रीचे लेखन एवढ्या मर्यादित नि एकांगी साच्यातून पाहण्यापेक्षा संवेदनाशील, सोशीक, रोखठोक, शिस्तप्रिय, कविताकलासक्त, मूल्यपूजक अशा स्वतंत्र नि सुसंस्कृत मनाची आत्मविभोर अभिव्यक्ती म्हणून पाहणे अधिक योग्य होईल.

आपल्या जीवनातील बिकट चढ-उतारांवर सुनीताबाईंनी 'चला लक्ष प्रश्नांचे आरव' असे म्हणत आपल्यापुरते एक प्रश्नोपनिषदच निर्माण केले आहे. प्रत्येक प्रश्नाच्या पिंजऱ्यामध्ये स्वतःला उभे करून त्या इतरांबरोबर स्वतःचीदेखील कठोर परीक्षा करतात. आपल्या आचारविचाराला आपल्या मनासारखा आकार देण्यासाठी त्या सतत संघर्षमय पावित्र्यात उभ्या दिसतात. एका अदम्य अतृप्ततेने, आणि परिपूर्णतेच्या उत्कट अभिलाषेने जीवनाचा आरपार वेध घेताना दिसतात. विराट सृष्टिचक्रामध्ये एखाद्या राळचाएवढे किंवा जे काही अणुरेणुसदृश असे आपले स्थान असते ( किंवा बहुधा नसतेच. ) अशा ठिकाणी उभे राहून सुनीताबाईंनी एकूण जीव-जीवन, कला-कविता, आदिम वेदना, अहम्‌चा पसारा, सृजनाच्या गूढरम्य गुहा, जन्म-मृत्यूमधील क्षणभंगुर कवडसा, स्त्री-पुरुषांतील नात्यांचा अनेकरंगी गोफ, प्रेमभावना, स्वातंत्र्य, दुःख, मातृत्व, मैत्र, स्त्रीत्व, औदार्य, एकटेपण, अस्तित्व इ० विविध विषयांसंबंधी आत्मरंगी मग्न होऊन केलेला आत्मसंवाद मोठा अपूर्वाईचा आहे. एखाद्या दार्शनिकाने घेतलेला जीवनवेधही इथे फिका ठरावा नि वाचकांची अवस्था 'निर्गुणाचे भेटी आलो सगुणासंगे ' अशी काहीशी व्हावी, असे हे आत्मप्रत्ययाचे बोलणे.

पु. लं. चे निर्मितिसन्मुख सर्जनशील कलावंतपणही सुनीताबाईंनी सहृदयतेने समजून घेतले आहे. त्यातील ताप-तपशील, जाच-काच इ. चे वर्णन विशेष विस्ताराने केले आहे. अर्थात तरीही हर्षविमर्शादीयुक्त असे मातीच्या सनातन पदराखाली घट्टपणे चिकटलेले अनावृत्त माणूसपण ज्याचे त्यालाही जिथे गवसत नाही; तिथे सुनीताबाईंनी पु. लं. वर अन्याय केला आहे. त्यांना आळशी वगैरे म्हटले आहे, असे पुरावे पानापानांवर शोधून काढणाऱ्यांना कोण काय सांगणार ! वास्तविक कोणतेही प्रवाही व्यक्तित्व म्हणजे एक अजब रसायन असते. एका बाजूला बाई मोठ्या समजूतदार, संयमी, सतत सावध नि कमालीच्या दक्ष, विशेष टापटिपीच्या, विनयशील वगैरे आणि दुसरीकडे तितक्याच तिखट, कठोर, मूल्यांकरिता कृतिशीलपणे आग्रही, मोहरीगत तडकून उठणाऱ्या, काटेकोर, चोख नि चिकित्सकही. सकृत्‌दर्शनी या अशा परस्परविरोधी धाग्यांनी बाईंचे व्यक्तिमत्त्व साकारले आहे असे वाटते. परंतु इंद्रधनुष्यातील सप्तरंगांच्या तळाशी जसे एकच एक परमधवल रंगतत्त्व असते, तशीच ही गोष्ट आहे. मूळ पिंडाचे कितीतरी विस्मयकारी विभ्रम प्रत्येक व्यक्तीमध्ये दिसतात.

आयुष्याच्या प्रत्येक पावलावर बाईंनी स्वतःला नि इतरांनाही घासूनपुसून स्वीकारले आहे. त्यामुळे त्यांच्या कसोटीला उतरलेली किंवा न उतरलेली उत्तुंग माणसेच तेवढी इथे भेटतात. खरे तर, पु. ल. आणि सुनीताबाई दोघेही गर्दीच्या गावामध्ये रमलेली कलाप्रिय व्यक्तिमत्त्वे असली, तरी ती तशी आत आत आत्मकोशात एकटी एकटीच आहेत ... कदाचित या आत्मगत एकटेपणामुळे की काय कोण जाणे, बाईंच्या लेखनात सखोल नि सर्वदूर अशा उदासीचे भुरभुरते मळभ दाटून आल्यासारखे वाटते. पापणीवर अवघडलेल्या थेंबातून जसे एखादे थरथरते दृश्य दिसावे, तसेच काहीसे.

एक गंमत म्हणून क्षणभर अशी कल्पना केली, की पु. लं मध्ये ( म्हणजे सुनीताबाईंनी चितारलेल्या या लेखनातील पु. ल.–प्रतिमेत) जो एक थंडपणा, आळस अथवा प्रसंगी झकास मूलपण आहे, त्याऐवजी नियतीने त्यांना अतिविक्षिप्त कलावंतपणाचे इतरांना रक्तबंबाळ करणारे करवती काटे–कंगोरे बहाल केले असते तर;– ' स्त्री-स्वातंत्र्य 'वादी वगैरेंची फळी सुनीताबाईंच्या बाजूने उभी राहिली असती, नि बाईंना कुणीही ' हेडमास्तरीण, दारातलं कुत्रं ' वगैरे म्हणून ' गौरविले ' नसते. ही गमतीदार कल्पना एवढ्यासाठीच करावयाची की बाईंच्या या आत्मकथनावर भाबड्या पु. ल. प्रेमी वाचकांकडून कसा अकारण अन्याय होतो आहे, हे ध्यानात यावे.

पु. लं. च्यामधील सव्यसाची कलावंताइतकाच त्यांच्यातील माणूसही चतुरस्र व चौफेर असला पाहिजे



अनुक्रमणिका

असे गोड गृहीत धरून आपण त्यांच्यावरही एक प्रकारे अन्याय करतो, हे आपल्याला समजत नाही. वास्तविक पाहता, पु. लं.विषयीच्या अपार प्रेमलोभातून नि त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या पूर्णत्वाची अनावर अभिलाषा बाळगून सदैव प्रार्थनारत असणाऱ्या स्त्रीस्वभावसुलभ अभिजात पराक्रमपूजक प्रवृत्तीतूनच पु. लं.बद्दलची बाईंची तथाकथित 'नाराजी' वगैरे व्यक्त झाली आहे. ही अशी साधी समंजस भूमिका घेतली की या लेखनाचा कसदारपणा कणाकणाने चमकून उठतो. इतकेच नव्हे, तर पु. ल. आणि सुनीताबाई यांच्यातील माणूसपणाचे अनेक मनमोहक पैलूही दिसू लागतात.

आणखी एक गोष्ट इथे नोंदविली पाहिजे ती ही की, मऊ मखमली कलावंतपणाच्या सोनेरी पदराखाली असलेला खरा माणूस त्याच्या गुणावगुणांसह कुणी चितारला तर आपल्याकडील विभूतिपूजक समूहाकडून ते चित्रण निंदाविषय ठरते. या लेखनाच्या संदर्भात ही बाब पुरेशा स्पष्टपणे समोर आली आहे. खरे तर, सुनीताबाईंच्या लेखनात (म्हणजे रूढार्थाने इथे आत्मचरित्रात) त्यांची स्वतःची प्रतिमा ठसठशीतपणे अभिव्यक्त होत असेल, तर अन्य बाबी गौण आहेत.

पु. ल. व सुनीताबाई यांचा या लेखनामध्ये प्रतिबिंबित झालेला घर-संसारही जगावेगळा नाही (तो तसा असता तर आश्चर्य वाटले असते). इथेही बायकोच्या नवऱ्याविषयी आणि नवऱ्याच्या बायकोविषयी व्यक्त-अव्यक्त तक्रारी आहेत, रुसवे-फुगवे आहेत. एरवी, कलावंत या नात्याने ही माणसे सामान्यांहून कितीही वेगळी असली, तरी सांसारिक जीवनात हाडामांसाचीच माणसे आहेत. याचे अतिशय लोभसवाणे दर्शन या लेखनातून घडते. कुणी एकाने आग झाले की, दुसरा आपसुख पाणी होतो. हे खरे आहे, की अधिक वेळा पाण्याची भूमिका पु. लं. नीच बजावली आहे. इथेही पुन्हा एक मौज अशी की, याविषयीची एक सतत कृतज्ञ जाणीव किंवा खरे तर सलच, एखाद्या किमती अलंकारासारखी सुनीताबाईंनी मनोमन जपली आहे (प्रश्न पडावा की, याच का त्या बंडखोर, करारी वगैरे बाई). सहप्रवासातील ऊन-पावसाचा हा सनातन खेळ उभयतांमधील कलावंताच्या कलंदरपणापेक्षाही त्यांच्यातील माणूसपणाच्या मोहिनीमुळेच आपणाला विस्मयचकित करून सोडतो. सुनीताबाईंनी एके ठिकाणी स्वतःबद्दलही नाराजी व्यक्त केली आहे; नि ती त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या चैतन्यशीलतेची खूण आहे– "स्वतः परफेक्शनिस्ट असणे ठीक आहे. पण इतरांकडूनही तीच अपेक्षा ठेवणे आणि मुख्य म्हणजे या बाबतीत घडीघडी होणाऱ्या अपेक्षाभंगाबद्दल तक्रार करणे, वैतागणे आणि वातावरणात त्यामुळे ताण निर्माण करणे हे काही बरोबर नव्हे. त्यामुळे अशी माणसे सर्वत्र नकोशी होतात. आपल्याबद्दल इतरांच्या मनात अशी भावना असणे हे काही सुखावह नाही." (पृ. २२८) इथून पुढे अगदी शेवटच्या पानापर्यंत आपण एक भावमधुर गद्यकाव्य वाचत जातो. तिथेही सर्व प्रश्न संपलेले नाहीत. तरीदेखील एक अटळ असा पूर्णविराम येतो. लेखिकेबरोबर वाचकही मानसिक ग्लानी येऊन थांबतो... मनातल्या मनात खोल खोल आपल्यातील माणूस आतमध्ये उतरत राहतो. नि अंतर्मुख करणारी एक सुखद उदासी मनभर पसरत जाते.

या लेखनाची शैली आणि शब्दकळा यांवर खूप लिहिता येण्यासारखे आहे. 'गागर में सागर' भरणारी अशी ही सामाजिक, तटस्थ आणि अचूक अर्थवाही शैली मोठी काव्यपूर्ण आहे.

पुस्तकाची मांडणी, मुखपृष्ठ, छपाई इ. सर्व तांत्रिक अंगे एकदम खानदानी नि कलात्मक आहेत.

**–वसंत केशव पाटील**



# वाद्–संवाद्

## ज्ञानेश्वरीप्रतलेखनकाल : एक ओढाताण

डॉ. सु. बा. कुलकर्णी यांनी ज्ञानेश्वरीप्रतलेखन-काल ठरविण्यासाठी ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायातील १७८१ व्या ओवीचा आधार घेतलेला आहे व तिच्यातील शब्दांचे संख्यावाचक सांकेतिक अर्थ दाखवून तो शक १२०८ असावा, असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे (' नवभारत ' एप्रिल १९९०). तो कसा चुकीचा आहे हे मी ' नवभारत 'च्या जून १९९० च्या अंकात पृ. ५३-५४ वर दाखवून दिले आहे. शक १२०८ या आपल्या ज्ञानेश्वरीप्रतलेखनकालाला पुष्टी देण्यासाठी त्यांनी आता ' तुका विप्रां 'ची साक्ष काढली आहे (' नवभारत ' जून ९०; पृ. ४२–४४) त्याबद्दलचा विचार आता करावयाचा आहे.

पहिली गोष्ट अशी, की तुका विप्रांचा काळ शके १६५१ ते १७१३ म्हणजे ज्ञानेश्वरांनंतर सुमारे ४५०–५०० वर्षांचा येतो. चरित्रलेखक जितका उत्तरकालीन तितकी त्याची विश्वसनीयता कमी होते. हे लक्षात घेतल्यास तुका विप्रांनी लिहिलेल्या ' ज्ञानेश्वरचरित्राख्याना 'चे ऐतिहासिक मूल्य फार कमी होते. ' त्यातील ऐतिहासिक भाग किती व काल्पनिक किती याची निवड करणे सोपे नाही ', असे खुद्द डॉ. कुलकर्णी यांनीच म्हणून ठेवले आहे. ' तुका विप्र यांच्या ज्ञानेश्वराख्यानात त्यांच्या पश्चात बरीच कोंबाकोंबी झालेली असावी ', असे तेच म्हणतात. म्हणजे मुळात तुका विप्रांच्या ज्ञानेश्वरचरित्रात बराच भाग काल्पनिक असण्याची शक्यता व त्यातच या प्रक्षेपांचाही गोंधळ ! म्हणजे तुका विप्रांच्या ज्ञानेश्वरचरित्राख्यानाचे मूल्य आणखी घसरते. इतिहाससंशोधकांनी अशा ग्रंथांचे दंतकथात्मक स्वरूप लक्षात घेऊन खरे तर त्याचा आधार घेणेच चुकीचे आहे.

आता तुका विप्रांनी नमूद केलेल्या ज्ञानेश्वरीप्रतलेखनाच्या कालाचा विचार करण्यास हरकत नाही. त्यासाठी डॉ. कुलकर्णी यांनी त्यांची पुढे दिलेली ओवी उद्धृत केली आहे–

' गत गेली च्यार । चार हजार तीनशें ।
नव्वद वरूसें । लोटलियां ॥ १२६ ॥ '

ह्यांच्या मते चार हजार तीनशे नव्वद यांतून चार वजा केल्यावर ४३८६ हे कलियुगाचे वर्ष (= शक १२०८) मिळते, पण हे बरोबर नाही. याला कारणे दोन. पहिले कारण असे, की त्यांचे या ओवीचे वाचन चुकलेले आहे, असे वाटते. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे या ओवीत कलियुगाचे वर्ष नोंदविलेले आहे. अर्थातच या ओवीत कोठेतरी ' कलि ' हा शब्द येणे आवश्यक ठरते. म्हणून त्यांनी जो ' केली ' शब्द वाचला, तो मुळात ' कलि ' अथवा ' कली ' असा असला पाहिजे. म्हणजेच ' गत केली च्यार ' ऐवजी ' गत कली च्यार ' अशी मूळ ओवीची ओळ असली पाहिजे. अर्थातच या वाचनाच्या योगाने कलियुगाच्या वर्षगणनेतून ' चार ' ही संख्या ' वजा ' (गत) करण्याचे कारण राहात नाही.

त्यांनी दिलेल्या ओवीत ' च्यार ' व ' चार ' ही संख्या दोनदा (पहिल्या चरणाच्या शेवटी व दुसऱ्या चरणाच्या प्रारंभी) येते. हा स्पष्टपणे लेखकप्रमाद असला पाहिजे. कारण तुका विप्रांच्या ज्या इतर ओव्या उद्धृत करण्यात आल्या आहेत, त्यांच्या चार चरणांतील अक्षरे ६, ६, ६ व ४ अशी दिसतात. आठ अक्षरे कोणत्याही चरणात दिसत नाहीत. डॉ. कुलकर्णींच्या मते ज्ञानेश्वरीप्रतलेखनाचा काल दर्शविणाऱ्या पूर्वोल्लिखित ओवीच्या दुसऱ्या चरणात मात्र आठ अक्षरे येतात (चार हजार तीनशे). तुका विप्रांच्या ज्ञानेश्वरचरित्राख्यानाचा लेखनकाल नोंदविणाऱ्या ज्या ओव्या डॉ. कुलकर्णी यांनी उद्धृत केलेल्या आहेत (२२२ ते २२५), त्यांपैकी २२४ वी ओवी तर अगदी स्पष्ट आहे. ' गतकाली च्यार । हजार आठसे । सत्तर प्रत्यक्ष । चालियेले ॥ २२४ ॥' अशी ती ओवी आहे. या ओवीतील ' गतकाली ' या पदाचे वाचन चुकलेले दिसते. तेथेही ' गतकली ' असाच शब्द असला पाहिजे. त्यामुळे १२६ व्या ओवीच्या पहिल्या चरणाच्या शेवटी येणारा ' च्यार ' हा शब्द लेखकप्रमादाने पुन्हा दुसऱ्या चरणाच्या प्रारंभी आवृत्त झाला असावा, असे अनुमान निघते. तसे झाले की कलियुगाची वर्षगणना चार हजार तीनशे नव्वद येते व तिच्यातून ३१७८ वजा केल्यास ज्ञानेश्वरीचा प्रचलित लेखनशक १२१२ येतो, १२०८ नव्हे.







अनुक्रमणिका

तुका विप्रांना ज्ञानेश्वरीलेखनाचा रूढ शकच (१२१२) मान्य होता, हे दाखविण्यासाठी आणखी एक पुरावा आहे, व तोही सुदैवाने डॉ. कुलकर्णी यांनीच उपलब्ध करून दिला आहे. " आजपासून २९४ वर्षांनी एकनाथ त्यांचा शोध करील " अशी भविष्यवाणी त्यांनीच ज्ञानेश्वरांच्या तोंडची म्हणून दिली आहे (पृ. ४४). एकनाथांनी ज्ञानेश्वरीचे शुद्धीकरण शके १५०६ मध्ये केल्याचे वादातीत आहे. तेव्हा १५०६ मधून २९४ वजा केल्यास येणारी संख्या १२१२ येते, १२०८ नव्हे. अशा रीतीने डॉ. कुलकर्णी यांनी ज्ञानेश्वरीलेखनकाल ठरविण्यासाठी तुका विप्रांची काढलेली साक्ष त्यांना पोषक तर ठरतच नाही, उलट बाधक मात्र ठरते.

— रा. पां. निपाणीकर

## गांधीवाद अन् आधुनिक मराठी साहित्य

नवभारत ( मे १९९० ) च्या अंकात प्रो. गो. म. कुलकर्णी यांचा गांधीवाद व आधुनिक मराठी साहित्य ( १९२०–१९५० ) हा अभ्यासपूर्ण, विचारप्रवर्तक, चिंतनशील लेख वाचला. त्यामधील विश्लेषण मार्मिक वाटले.

लेखात वर्णन केल्याप्रमाणे गांधीवाद हा भारतीय अध्यात्मधारणाची एक संशोधित आवृत्ती आहे. त्यामध्ये सत्याचा सतत शोध घेण्याचा प्रयास असतो. हा आत्मशोध आत्मकेंद्रित स्वरूपाचा नसून समाजसापेक्ष असतो हे त्याचे आगळे वैशिष्टच. गांधीवादातील मूल्ये आध्यात्मिक स्वरूपाची असली तरी त्यांत ऐहिकता-संबंधित प्रश्नाकडे दुर्लक्ष नाही. आपल्या देशाच्या सामाजिक, आर्थिक व राजकीय व्यवस्थेत अनेक दोष निर्माण झाले आहेत. यात सुधारणा करण्यासाठी, परिवर्तने घडवून आणण्यासाठी, भारतीय परंपरेशी सुसंगत असा एक क्रियाशील मार्ग गांधीवादातून मिळतो. गांधीवाद हा धर्मपंथ नाही आहे. गांधीवाद एक नवीन जीवनदृष्टी देतो. अन्यायाविरुद्ध निषेध ( प्रोटेस्ट ) नोंदविण्यासाठी, त्याचा सक्रिय प्रतिकार करण्यासाठी म. गांधींनी सत्याग्रह, असहकार, कायदेभंग, हरताळ असे अनेक मार्ग सुचविले; अमलात आणून दाखविले. त्याचा परिणाम भारतापुरता मर्यादित राहिलेला नाही आहे. परदेशांत त्याचा वाढत्या प्रमाणात वापर होत असल्याचे दिसत आहे. म्हणून हा लेख अगदी योग्य वेळी प्रसिद्ध होत आहे असे वाटले.

लेखातील काही मुद्द्यांबद्दल अधिक तपशील आला असता तर चांगले झाले असते असे वाटल्यावरून हे पत्र लिहीत आहे.

१ ) लेखात नमूद केले आहे की राजकारणाला अध्यात्माची जोड द्यावी ही प्रेरणा म. गांधींना गोखले – रानडे यांच्यापासून मिळाली. त्या काळातील भारतीय विद्वानांवर स्पेन्सर आदी इंग्रजी विचारवंतांचा खूप प्रभाव होता. त्यामुळे त्यांची अपेक्षा राजकारण नीतीनियमावर आधारित असावे अशी असावी. गांधी-वादाला धर्मतत्त्वाचे अधिष्ठान आहे. हे त्यांस अपेक्षित होते काय ?

२) त्या काळातील सुधारकांनी ( उदा., आगरकर ) प्रबोधनयुगाची आधारमूल्ये-लोकशाही, व्यक्तिस्वातंत्र्य, समता, बंधुता, बुद्धिप्रामाण्य, विकास-वाद, मानवनिष्ठा यांचा स्वीकार केला होता असा लेखात उल्लेख आहे. पण ती प्रत्यक्षात अमलात कशी आणावयाची याविषयी काही विचार करण्यात आला नव्हता असे लेखातच म्हटले आहे.

युरोपमध्ये प्रबोधन काळात बुद्धिवाद आला त्यामुळे विज्ञान-विकासाला मदत झाली हे खरे आहे काय ? विज्ञानातील ज्ञान अनुभवसिद्ध असते. उप-करणविद्येमुळे असे ज्ञान मिळविण्याची क्षमता वाढली अन् म्हणून विज्ञानात विकास झाला.

गांधीवाद अन् विज्ञान यांच्या भूमिकेत जी अनेक साम्यस्थळे दिसतात त्यांचा उल्लेख लेखात येऊन त्या-विषयी टिप्पणी आली असती तर चांगले झाले असते.

१) दोन्ही पद्धतीत प्रयोगशीलतेवर भर असतो. अंतिम सत्य सापडल्याचा दावा केला जात नाही.

२) दोन्हींमध्ये चिंतनापेक्षा कृतिशीलतेचा उपयोग केला जातो.

३) स्थितप्रज्ञवृत्तीचा निरीक्षक, सत्य-प्रीती, सौजन्य, पूर्वग्रहदूषिततेचा अभाव ही दोघांचीही वैशिष्टचे.

४) दोघांमध्ये सांप्रदायिकता, पंथनिष्ठता यांना स्थान नाही. सत्याच्या शोधाचा प्रवासमार्ग असे वर्णन दोन्ही पद्धतींना लागू दिसते. गांधीवादामध्ये बुद्धी व सद्भावना या दोहोंना स्थान निव्वळ बुद्धीचा उपयोग केला तर मनुष्य स्वार्थसापेक्ष बनण्याची शक्यता असते.










अनुक्रमणिका

निव्वळ भावनेचा ( यासाठी श्रद्धा हा अधिक चांगला शब्द वाटतो. ) तर मनोभावात प्रयोगशीलता नवशोध प्रवणता राहणार नाही.

हे लेखातील निवेदन सत्य असेल तर विज्ञान व गांधीवाद यामागील प्रेरकशक्ती एकाच स्वरूपाच्या असतात असे म्हणता येईल काय ?

२ ) लेखात म्हटल्याप्रमाणे देशाच्या आधुनिकीकरणासाठी इंग्रजी भाषेतील ज्ञानभांडाराचा उपयोग होईल ही भावना योग्य होती. या कार्यासाठी विज्ञान व तंत्रविद्या यांमधील ज्ञान सर्वांत महत्त्वाचे हे नमूद करावयास हवे. ज्ञानाचा परिस्फोट जो होतोय तो याच क्षेत्रात. कोणतीही प्रणाली मनुष्याला सुखी करू शकेल की नाही हा विवादाचा प्रश्न होतो. त्याच्या किमान भौतिकी गरजा भागविण्याची व्यवस्था त्यामध्ये करता येणे शक्य असते ही गोष्ट मात्र खरी. आधुनिक काळात विचारवंत इहवादावर जो भर देतात त्यामागील भावना हीच असू शकेल.

किमान गरजा भागविण्याच्या प्रश्नाला दोन पैलू असतात. विज्ञान व तंत्रविद्या यांचे साहाय्य घेऊन, देशातील उत्पादन, वाढवून ( किंवा कामगाराची उत्पादनक्षमता वाढवून ) त्याला आवश्यक अशी साधनसामग्री निर्माण करता येईल. मनुष्याला त्याच्या गरजा कमी करावयाचे शिक्षण देऊनपण हा प्रश्न सोडवता येतो. गांधीवादाने मनुष्याचे लक्ष उपभोगतावादाच्या दुष्परिणामाकडे वेधले, आपल्या गरजा कमी करावयास शिकविले. देशातील लोकांच्या राहणीमानात सततची व अमर्याद सुधारणा हे उद्दिष्ट अमलात येणे अवघड हे विज्ञानाने दाखवून दिले आहे.

३ ) बहुजनसमाज व सुशिक्षित वर्ग यांमधील दुरावा इंग्रजी भाषेच्या अध्ययनामुळे अस्तित्वात आला हे खरे आहे काय ?

यापूर्वकाळातील विद्वान आपले बहुतेक लेखन संस्कृत भाषेतच करीत. या लिखाणात तत्कालीन राजकीय, सामाजिक प्रश्नांविषयीचा, सामान्य जनांच्या आशा-आकांक्षांचे चित्रण क्वचितच मिळायचे. डॉ. कोसांबी यांनी म्हटले आहे की सुतार, लोहार इ. कारागिरांस उपयुक्त वाटेल अशी माहिती देणारा एकही ग्रंथ त्या काळात उपलब्ध नव्हता.

देशी भाषेकडे इंग्रजांनी दुर्लक्ष केले हे विधान पूर्ण सत्य नाही. दक्षिणाप्राईझ कमिटीने त्या काळात अनेक सर्वमान्य इंग्रजी ग्रंथांचा अनुवाद करण्यास आर्थिक साहाय्य केले होते.

— वसंत चिपळोणकर

* *












# सार-संकलन

## अफगाणिस्तानातील अफूचे पीक

अफूपासून 'हेरॉइन' हे मादक द्रव्य–ड्रग–तयार करतात. ब्रह्मदेश सोडला तर इतर कोणत्याही देशापेक्षा अफगाणिस्तानात अफूचे जास्त पीक काढण्यात येते. ह्यातील ४० टक्के पीक हेल्मांड नदीच्या खोऱ्यात वाढते. अफूपासून मिळणाऱ्या दाट चिकाचे शुद्धीकरण करून हेरॉइन बनविण्याचे काम पाकिस्तानातील सरहद्दी-जवळच्या कारखान्यांत होते. खुद्द पाकिस्तानात १० लाख लोक मादक द्रव्याच्या व्यसनाच्या आहारी गेले आहेत. शिवाय सागरी किंवा हवाई मार्गाने बरेच हेरॉइन युरोपला पाठविण्यात येते. इराण व तुर्कस्तान अशा खुष्की मार्गानेही काही हेरॉइन युरोपात पोचते.

अफूचे पीक फायदेशीर आहे. गव्हाच्या पिकाच्या तुलनेने अफूपासून शेतकऱ्याला १५० पट नफा होतो. तरीही १९८९ मध्ये अफगाणिस्तानातील कम्युनिस्ट राजवटीविरुद्ध लढणाऱ्या नसीम आखुंडजादा ह्या गनीमी नेत्याने आपल्या हुकमतीखालील प्रदेशांतील शेतकऱ्यांना त्यांनी अफूची लागवड करू नये असे आदेश दिले होते. त्याच्या म्हणण्याप्रमाणे इस्लामाबाद येथील अमेरिकेचे वकील रॉबर्ट ओकले आणि इतर अमेरिकन अधिकारी ह्यांनी त्याला असे वचन दिले होते, की जर त्याने अफूच्या पिकावर बंदी घातली तर अमेरिका त्याच्या अनुयायांना शेतीसाठी मदत करील. हेल्मांडला परतल्यावर नसीमने अफू ही इस्लामविरोधी आणि हराम आहे असे जाहीर केले. अगोदर पेरलेले पीकही खणून काढावे असे त्याने फर्मावले. १९९० च्या मार्चमध्ये नसीम पेशावरला भेट द्यायला गेला असताना त्याचा खून झाला. पण नसीमने आपल्या बाजूने वचन पाळले होते हे अमेरिकन अधिकारी मान्य करतात. आणि तरीही अमेरिकेकडून कबूल करण्यात आलेली मदत आलीच नाही.

नसीमचा भाऊ रसूल ह्यामुळे प्रक्षुब्ध झाला. झालेल्याचा सूड उगवायचा असे त्याने ठरविले. आणि सूड उगवून वर पैसेही कमावता येतील हे त्याला स्पष्ट माहीत होते. त्याचे अनुयायी सांगतात, की अफूचे पीक सर्वत्र पेरावे, घरांच्या छपरांवरसुद्धा पेरावे असे आदेश त्याने दिले. हेल्मांडच्या खोऱ्यातील अर्धे पीक रसूलच्या अमलाखालील प्रदेशांत होते. आपण ह्या थराला गेलो हे रसूल अमान्य करतो. त्याचे म्हणणे असे, की अमेरिकनांनी आपले वचन पाळले नाही म्हणून यंदा अफूचे थोडेसे पीक आपण काढावे असा निर्णय आपण घेतला. त्याशिवाय गत्यंतर नव्हते कारण आमचा प्रदेश अतिशय गरीब आणि मागास आहे. अफूचे पीक काढणारे सर्वजण आर्थिक गरजेचाच नेहमी हवाला देतात.

ते कसेही असो मुसाकाला आणि काजाके ह्या हेल्मांडमधील रसूलच्या आधिपत्याखाली असलेल्या जिल्ह्यांत अफूचे पुनरागमन झाले आहे. गेल्या वर्षी अफूचे एक ताट किंवा बोंड ह्या प्रदेशात दिसत नव्हते.

आपण वचन दिले नव्हते पण अफूवरील बंदी यशस्वी झाली तर पुढे बोलणी करायची तयारी दाखविली होती असे अमेरिकन वकिलातीचे म्हणणे आहे. पण शेतीसाठी साहाय्य करण्याचे आश्वासन अमेरिकन अधिकाऱ्यांकडून देण्यात आले होते. आणि ह्या साहाय्यात गव्हाची सुधारलेली बियाणे, खते, जुन्या, बुजलेल्या कालव्यांची दुरुस्ती केल्याने होणारा अधिक पाणीपुरवठा इ. गोष्टींचा अंतर्भाव होता अशी कबुली वकिलातीतील एका अधिकाऱ्याने दिली आहे. अमेरिकन वकिलाने दिलेले आश्वासन सद्धेतूनेच दिले होते. पण अमेरिकेत अलीकडेच करण्यात आलेल्या कायद्यामुळे ते पाळण्यात अडचण आली. ह्या कायद्याप्रमाणे मादक द्रव्यांच्या उत्पादनात सहभागी असलेल्या कुणाही बरोबर कोणताही व्यवहार करण्यावर बंदी घालण्यात आली आहे.

हेल्मांडचे शेतकरी घेतले तर मादक द्रव्यांचा आंतरराष्ट्रीय व्यापार करणाऱ्या सराईत गुंडांप्रमाणे त्यांची स्थिती संपन्न आहे असे दिसून येणार नाही. मातीच्या भिंतींच्या घरात ते राहतात आणि ह्या घरात चैनीच्या आधुनिक वस्तू फारशा दिसत नाहीत (गनिमांचे जे नेते पाकिस्तानात राहतात त्यांच्या घरांतून त्यांची रेलचेल दिसेल). मादक द्रव्यांच्या धंद्यात जे खरा नफा करतात ते म्हणजे शुद्धीकरण करणारे




आणि व्यापारी. तरीही अफगाणिस्तानात अफूचे पीक काढण्याकडे शेतकऱ्यांचा कल वाढत आहे. अनेक ठिकाणी हे पीक नव्याने घेण्यात येत आहे आणि काही शेतकरी वर्षातून दोन पिके घेण्याची उमेद बाळगून आहेत.

## चांगले मरण

'युथेनेशिया' ह्या ग्रीक शब्दाचा अर्थ चांगले मरण असा आहे. व्यवहारात आता त्याचा अर्थ वेगळा झाला आहे. डॉक्टरने आवश्यक ती कार्यवाही करून आजारी माणसाचे जीवन, सामान्यतः त्याच्याच विनंती-नुसार संपुष्टात आणणे, ह्या घटनेला युथेनेशिया म्हण-तात. आजारी माणसाच्या विनंतीनुसार जरी अशी कृती करण्यात आली असली तरी ती जवळ जवळ सर्व देशांत बेकायदा समजण्यात येते. अमेरिकेत असे करणे म्हणजे आत्महत्येला साहाय्य करण्याचे कृत्य करणे होय असे मानले जाते. ब्रिटनमध्ये खून करण्याचा प्रयत्न असे त्याचे वर्णन होते. पण अखेरच्या आजारात माणसाला आता मरून जावे अशी इच्छा झाली तर ती तृप्त करायला साहाय्य करणे योग्य आहे असेच ह्या दोन्ही देशांतील बहुसंख्य लोकांना वाटते. अमेरिकेत ७० टक्के लोकांना, तर ब्रिटनमधील ७५ टक्के लोकांना हे कृत्य पसंत आहे.

आधुनिक वैद्यकाची रोग बरे करण्याची शक्ती आश्चर्यचकित करून सोडणारी आहे. अगदी ५० वर्षां-पूर्वीच्या काळाशी तुलना केली तरी त्या काळी कुणाला आशा करता आली नसती इतकी वर्षे आज माणसे जगत आहेत. पण आयुष्य इतके दीर्घ झाल्यामुळेच अनेक प्रश्न निर्माण होतात. मागे म्हाताऱ्या माणसांना न्यूमोनिया उचलून नेत असे. न्यूमोनियाला 'म्हाताऱ्यांचा दोस्त' म्हणत. किंवा हृदयविकाराचा झटका येऊन माणसे जात. आता न्यूमोनियावर 'अँटिबायॉटिक्स' आहेत. बंद पडलेले हृदयसुद्धा त्याचे उद्दीपन करून परत चालू करता येते. अति वृद्ध माणसापुढे शारीरिक व मानसिक दुबळेपण आणि परावलंबित्व यांनी ग्रास-लेला भविष्यकाळ उभा असतो.

आधुनिक वैद्यकाच्या अद्‌भुत शक्तीमुळेच काही समस्या निर्माण होतात. वैद्यकीय हस्तक्षेपामुळेच जे जिवंत राहिले आहेत आणि तो थांबविला तर जे निश्चितपणे मरतील त्यांना जिवंत राखावे का ? अशा अवस्थेत आपण जिवंत राहावे की नाही ह्याची निवड करण्याची मुभा रुग्णांना असावी का ? जेव्हा रुग्णाला बरे करण्याची शक्यता मावळलेली असेल तेव्हा त्याला अनायास मरण प्राप्त करून देण्याची सेवा डॉक्टरांनी पुरवावी का ?

१९८९ साली अमेरिकन सर्वोच्च न्यायालयाला नॅन्सी क्रुझन ह्या तरुणीच्या संदर्भात ह्या प्रश्नांचा विचार करावा लागला. मानवी जीवन पवित्र आहे आणि जीवनाचा संभाळ केला पाहिजे हे तत्त्व सर्व धर्म मान्य करतात आणि कायद्यातील तरतुदी ह्याच स्वरूपाच्या असतात. नॅन्सी क्रुझन एका मोटर अपघातात सापडली होती. सहा वर्षे ती पूर्ण बेशुद्धा-वस्थेत होती. तिचे जगणे केवळ 'वनस्पतीचे जगणे' होते. शरीरात टोचलेल्या नळ्यांतून तिचे पोषण होत होते. अशा अवस्थेत सहा वर्षे गेल्यानंतर ह्या नळ्या काढून घेण्यात याव्या ह्यासाठी परवानगी मागण्यासाठी तिचे आई-वडील मिसुरी राज्याच्या न्यायालयाकडे गेले. न्यायालयाने परवानगी नाकारली. रुग्णाची स्वतःची इच्छा काय होती ह्याविषयीचा स्पष्ट आणि निर्णायक पुरावा न्यायालयाला हवा होता. नॅन्सी कॉलेजात होती तेव्हा तिने मित्रांबरोबर गप्पा मार-ताना आपल्याला वनस्पतीसारखे जगणे अजिबात आवड-णार नाही असे म्हटले होते. पण हा निर्णायक पुरावा आहे असे न्यायालयाला वाटले नाही. स्वतः नॅन्सीच आपले मत द्यायला असमर्थ असल्यामुळे आपणच तिचे प्रतिनिधी आणि संरक्षक आहोत अशी भूमिका न्याया-लयाने स्वीकारली आणि तिला जिवंत ठेवणे हे एकंदरीत तिच्या हिताला पोषक आहे असा निर्णय दिला. मानवी जीवनाविषयीची आपली आस्था निरपवाद असली पाहिजे हे तत्त्व मिसुरी न्यायालयाने स्वीकारले. ह्यावर सर्वोच्च न्यायालयाकडे 'अपील' केले असता, त्यानेही मिसुरीच्या निर्णयाच्या बाजूने आपला कौल दिला. पण हा कौल बहुमताने देण्यात आला होता (नंतर नॅन्सीला स्वतःला अशा अवस्थेत जगणे नापसंत असते असे दाखवून देणारा अधिक पुरावा उपलब्ध झाल्यावर खालच्या न्यायालयाने पोषण-नळ्या काढून घेण्यास संमती दिली.).

न्यायालये आणि रुग्णालये यांच्या पुढची एक अडचण अशी, की जेव्हा आजारी माणूस स्वतःची इच्छा व्यक्त करायला असमर्थ असतो तेव्हा त्याचे कुटुंबीय केवळ त्याच्या हिताचा विचार करून निर्णय घेतील असा

भरवसा त्यांना बाळगता येत नाही. कुटुंबात नेहमी एकी, परस्परप्रेम असतेच अशी खात्री बाळगता येत नाही. तेव्हा सरकारला किंवा इस्पितळातील डॉक्टरना रुग्णाच्या हिताचे प्रतिनिधी आणि संरक्षक ही भूमिका बजावावी लागतेच. पण खरा प्रश्न असा आहे, की रुग्णाचे खरे हित कशात असते ? आणि हे कसे शोधून काढणार ? येथे रुग्णाच्या स्वायत्ततेचाही प्रश्न उपस्थित होतो. स्वतःच्या जीवनाविषयीचे निर्णय घ्यायला रुग्णाला अधिकार आहे. आणि जो रुग्ण बोलू शकत नाही किंवा आपले मत व्यक्त करू शकत नाही त्याच्या वतीने त्याचे जीवन आता जगण्यालायक उरले नाही, त्याचा अंत केलेला बरा असा निर्णय कुणी घेऊ शकेल का ?

ह्याच्यावर एक तोडगा असा, की व्यक्तीने आपले 'जीवनविषयक मृत्युपत्र '– living will– बनविणे. व्यक्तीच्या सर्व मानसिक शक्ती शाबूत असताना असे मृत्युपत्र करण्यात येते आणि त्याच्यात आपला आजार अखेरचा ( टर्मिनल ) ठरला तर आपल्याला कोणत्या प्रकारचे औषधोपचार नको आहेत हे स्पष्टपणे नमूद केलेले असते. आणि ह्या इच्छेप्रमाणे औषधोपचार होत आहेत की नाही ह्याचा निर्णय घेण्याचा अधिकार एका विशिष्ट व्यक्तीला, त्या रुग्णाचा प्रतिनिधी म्हणून देण्यात आलेला असतो. अशी जीवनविषयक मृत्युपत्रे युरोप-अमेरिकेत आता लोकप्रिय होत आहेत. पण ह्यातही एक अडचण आहे. डॉक्टर आणि रुग्ण यांच्यात मोकळेपणे चर्चा होऊन कोणत्या उपचारांचे कोणकोणते परिणाम होतील ह्याची माहिती रुग्णाला मिळाल्यावर तो जसा निर्णय घेऊ शकेल तसा निर्णय अशा मृत्युपत्रांमुळे त्याला घेता येत नाही. त्याने अगोदरच निर्णय घेऊन ठेवलेला असतो आणि तो त्याच्या प्रतिनिधीवर आणि डॉक्टरवर बंधनकारक असतो. डॉक्टरशी चर्चा केल्यावर त्याच्या प्रतिनिधीला हा पूर्वनिर्णय रुग्णाच्या दृष्टीनेच अहितकारक वाटला तरी तो काही करू शकत नाही. अमेरिकन मेडिकल असोसिएशनने १९८८ साली घेतलेल्या एका सर्वेक्षणात असे आढळून आले, की प्रौढ व्यक्तींतील ५६ टक्के व्यक्तींनी आपण अखेरच्या बेशुद्धावस्थेत सापडलो, परत शुद्धीवर येण्याची शक्यता नाही असे असले तर आपल्याला कोणत्या प्रकारचे उपचार पसंत असतील ह्याची आपल्या कुटुंबियांशी चर्चा केली होती. पण फक्त १५ टक्के प्रौढांनी जीवनविषयक मृत्युपत्र केले होते. ह्याचा अर्थ असा, की पूर्वनिर्णय घ्यायला लोकांची तयारी नाही.

अशा मृत्युपत्रांचा आणखी एक फायदा आहे. आज विकसित देशांत इस्पितळांवर होणाऱ्या खर्चाचा २० ते ३० टक्के एवढा भाग अखेरच्या अवस्थेतील रुग्णांवर होतो. त्यांच्यावर कितीही पैसा खर्च केला तरी ते बरे होणार नाहीत. रुग्णाने जर जीवनविषयक मृत्युपत्र केले असेल तर त्याच्यावर एऱ्हवी जे विफल उपचार केले असते ते करण्याचे कारण उरत नाही आणि ह्यामुळे वाचलेला पैसा, वेळ आणि सुविधा जे रुग्ण बरे होणे शक्य आहे त्यांच्याकरिता वापरता येतो. सर्वसाधारणपणे डॉक्टरमंडळी उपयुक्ततेचे किंवा खर्च–लाभ–प्रमाणाचे (cost–effectiveness) तत्त्व स्वीकारायला नाखूष असतात. म्हणजे अमुक इतका वेळ आणि अमुक इतका पैसा– औषधे, सोयी, तज्ज्ञांचा सल्ला, परिचारिकांची सेवा इत्यादींवर खर्च करण्यासाठी उपलब्ध आहे. ज्या रोग्यांवर हा वेळ आणि पैसा खर्च केला असता जास्तीत जास्त लाभ होईल, म्हणजे जास्तीत जास्त रोगी जास्तीत जास्त प्रमाणात बरे होतील अशा रोग्यांना उपचारासाठी निवडावे व इतरांना वगळावे असे ते करीत नाहीत. ते 'न्याया'च्या तत्त्वाचा अवलंब करतात : जे खूप वर्षे जगले आहेत आणि ज्यांचा शेवट जवळ आला आहे त्यांच्यापेक्षा ज्यांच्या जीवनाला नुकताच प्रारंभ होतो आहे त्यांना जगण्याचा अधिक हक्क आहे. तेव्हा वृद्धांनी आपल्या अखेरच्या अवस्थेत अमुक प्रकारचे उपचार आपल्याला नकोत असे लिहून दिले तर मर्यादित साधनांचा कोणत्या रुग्णांसाठी वापर करावा ह्याचा निर्णय घेताना डॉक्टरांपुढे ज्या कठीण समस्या उभ्या राहतात त्या सौम्य होतील.

तरीही एक मध्यवर्ती प्रश्न उरतोच. मानवी जीवनाचे मूल्यमापन कसे करता येईल ? वृद्ध जीवन, पूर्णपणे जगले गेले आहे असे जीवन हे तरुण जीवनापेक्षा, ज्याच्यात सुप्त असलेल्या शक्यता अजून मूर्त व्हावयाच्या आहेत अशा जीवनापेक्षा कमी मूल्यवान असते हे कसे ठरते ? ज्यातील जाणीव हरवली आहे, ज्यात हृदयाचा ठोका चालू आहे पण मेंदू सुप्त आहे असे जीवन ज्यात जाणीव जागृत आहे अशा जीवनापेक्षा कशावरून कमी मूल्यवान आहे ? असे आपण मानीत असतो तर मानवी जीवन हे मूलतः काही जैव (biological) कार्यांचा

समुदाय आहे किंवा व्यक्तित्वाचा आविष्कार आहे असे आपण मानतो असे होईल आणि हे त्याचे स्वरूप जर नष्ट झाले तर त्याचे मूल्यही नष्ट होते असे आपल्याला स्वीकारावे लागेल. म्हणजे मानवी जीवनाला केवल, निरपेक्ष मूल्य आहे अशी आपली भूमिका असणार नाही.

आज विकसित देशांतील इस्पितळांतून जे मृत्यू होतात त्यांतील ७० टक्के मृत्यू हे कोणत्या तरी प्रकारची शुश्रूषा थांबविण्याच्या निर्णयामुळे घडून आलेले असतात. हा एक प्रकारे मृत्यू घडवून आणण्याचा, म्हणजे ठार मारण्याचा प्रकार आहे असे अनेकांना वाटते. डॉक्टरने कनवाळूपणे हस्तक्षेप करून, असाध्य रोगाच्या वेदनांनी विव्हळत असलेल्या माणसाला मृत्यू प्राप्त करून देणे काय, किंवा असाधारण उपचारांच्या साहाय्याने रोगी जिवंत राखण्यात आलेला असताना ते बंद करून मृत्यूची वाट मोकळी करून देणे काय, परिणामाच्या दृष्टीने दोहोंत काही फरक नाही असे त्यांना वाटते. पण ह्याच्याशी अनेक डॉक्टर असहमत आहेत. ब्रिटिश मेडिकल असोसिएशनचे म्हणणे असे, की जेव्हा उपचार थांबविण्यात येतात तेव्हा डॉक्टर किंवा रोगी असा निर्णय घेत असतो की रोगी बरा होईल अशी आशा बाळगता येणे अशक्य ठरल्यामुळे उपचार चालू ठेवण्यात काही अर्थ नसतो आणि म्हणून उपचार चालू ठेवण्याचे नैतिक बंधन संपुष्टात येते. कारण त्यामुळे रोग्याचा कोणताही लाभ होणार नसतो. जीवन संपुष्टात आणावे असा हा निर्णय नसतो तर जो आजार असतो त्याच्या पुढच्या अवस्था नैसर्गिक क्रमाने घडून यायला मुभा देण्यात आलेली असते. मृत्यू येतो तेव्हा तो आजाराने घडवून आणलेला असतो, डॉक्टराने नव्हे.

असाधारण उपचार थांबविण्यात आले म्हणून शुश्रूषाच थांबते आणि सर्वजण अधिरेपणे किंवा स्वस्थतेने मरणाची वाट पाहात बसतात असे व्हायचे कारण नाही. रोग्याची काळजी घेता येते. त्यासाठी खर्च फार नसतो. पण वेळ आणि माया द्यावी लागते. शक्य असेल तर रोग्याला अन्न देणे, त्याला आराम मिळेल इकडे ध्यान देणे, त्याच्याशी बोलून, सल्ला देऊन त्याच्या मनाची उभारी टिकवून धरणे आणि विशेषत: त्याच्या वेदना कमी करणे हे सर्व आस्थेने करता येते. मृत्यू थोपवून धरण्याचा आता प्रयत्न नसतो; पण मरण ओढवूनही आणले जात नाही. रोग्याची काळजी घेणे हा जो डॉक्टराचा धर्म आहे तो डॉक्टर पाळू शकतो.

हे सर्व घरीही करता येईल. आज इस्पितळांवर जो भर आहे तो तेथे उपलब्ध असलेल्या असाधारण उपचारांसाठी. त्यांचे आता काम उरले नाही हे ध्यानात येईल. माणसाला आपल्या कुटुंबियांच्या सान्निध्यात ओळखीच्या फॅमिली डॉक्टरचा सल्ला घेत, मन शांत करीत मृत्यूला सामोरे जाता येईल. मग कृत्रिम मार्गाने मरण ओढवून घेण्याचा प्रयत्नही करावा लागणार नाही.

मरणावर सर्वस्वी नियंत्रण मिळविण्याचा प्रयत्न करण्यात अर्थ नाही. सर्व संबंधितांनी त्याचा अर्थ समजून घेऊन त्याचा स्वीकार केला पाहिजे. धार्मिक परंपरेत मरणाची दहशत नव्हती. पण, मरण हे अत्यंत गहन असे गूढ आहे, त्याला चकविण्याचा प्रयत्न करणे म्हणजे जीवनालाच चकविण्यासारखे आहे अशी समजूत होती. 'तुमचे येथे येणे तुम्ही सहन केले, तसे तुमचे इथून जाणेही तुम्ही सहन करा.'



अनुक्रमणिका

हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका